( मुंबई इलाखा व मध्यप्रांतांतील शिक्षणखात्यांची मंजुरी मिळालेली )

इंग्रजी शाळांतील खालच्या वर्गांसाठीं

मॅक्मिलनचीं

# मराठी वाचन पुस्तकें

## पुस्तक पहिलें

मॅक्मिलन आणि कंपनी, लिमिटेड
मुंबई

१९३४

# अनुक्रमणिका

या पुस्तकांत घेतलेले उतारे छापण्यास परवानगी दिल्याबद्दल प्रकाशक पुढील सद्गृहस्थांचे ऋणी आहेत:—

प्रवासी व स प, व हात लावला की सोनें—व्यवस्थापक, आर्यभूषण छापखाना, पुणें, विद्येची भूपाळी, व नामलेखन—श्री. चिं. का. मोडक, कल्याण, मुल्ला अहमदाची सून, व तरुवरा—श्री. वि. द. घाटे. अहमदाबाद, मावळ्यांचें गाणें व कृतज्ञता—श्री शं. के. कानेटकर, फलटण, शकुन—श्री. रा. गो. ओक, मुंबई; शाळा-श्री. दु. आ. तिवारी, जळगाव; मलिकबर, शाहू महाराजांचा कुत्रा, कुतुबमिनार, व जहागीरचा न्याय—श्री अ. द. पारसनीस, सातारा; फुलपाखरूं—श्री मा. के. काटद्रे, मुंबई, हिऱ्याच्या दरींतील रात्र—व्यवस्थापक, विश्वनाथ गणेश आणि मंडळी, पुणें; दैवाचे थेंब—श्री. प चिं. दामले, राहुरी, समर्थ रामदास व सज्जनगड—प्रि गो. चि भाटे, सांगली, आराम—श्री गो. रा चोळकर, इचलकरंजी, बाललीला- प्रो. वा. गो. मायदेव, पुणें, अबूचा पहाड—प्रो. ग र अभ्यंकर, सांगली, हितोपदेशातील गोष्टी—प्रो. रा. प. सबनीस, पुणें, निर्जळी एकादशी—श्री श्री. कृ कोल्हटकर, खामगांव, जगीं उपमा कोणती त्या गृहातें व प्रियकर हिंदिस्तान—श्री. दे. ना. टिळक, नाशिक; रामाचा सेतु—व्यवस्थापक, मासिक मनोरंजन, मुंबई, उमाबाई दाभाडे—श्री. गो. अ. मोडक, पुणें; उद्याचा वीर-प्रो. ना के. बेहेरे, नागपूर, हा हिंद देश माझा—श्री. आ कृ. टेकाडे, नागपूर; संसार की वैराग्य—श्री. कृ. केळुसकर, दादर, मुंबई, मुलानें न्याय दिला—व्यवस्थापक, चित्रशाळा प्रेस, पुणें.

## ईशस्तवन

जगत्पाळ चित्तांत माझ्या वसावा,
दयालोभ त्याचा सदाही असावा;
न तत्सेवनीं जीव माझा चुकावा,
कधीही न तो नित्यसौख्या मुकावा १

दयासिंधु, मीं नित्य तूतें स्मरावें,
तुझ्या पादपद्मांस चित्तीं धरावें,
पुढें वासनाभृंग तेथें जमावे,
कधींही न अन्यस्थलीं ते रमावे. २

प्रभो, बाल अज्ञान होतों मुका मीं,
असें सर्वही अंग माझें निकामी;
अहोरात्र होई बहू मी भुकेला,
तशा संकटीं तूंच सांभाळ केला. ३

पुढें, तूं दिली शक्ति देवा क्रमानें,
तशी बुद्धि, वाणी दिली त्याच मानें;
करूं लागलों मी स्वतां उद्यमातें,
तरी साह्य देवा तुझें सर्व मातें. ४

कृपेने तुझ्या विश्वविस्तार सारा,
जनाच्याच सौख्यार्थ केला पसारा;
न देशी जरी इष्ट तूं विश्वपाळा,
तरी प्रार्थिजे अन्य कोणा कृपाळा ? ५

कशाचेंहि साद्दश्य ज्याला पटेना,
कधीं थोर ऐश्वर्य ज्याचें घटेना,
जनप्रीति ज्याची कधींही सरेना,
सदा सेवितां त्यास पीडा उरेना. ६

शशी, सूर्य हे नित्य आज्ञेंत ज्याच्या,
पदाला सदा मी नमीं त्या अजाच्या,
हरो ताप माझा, जळो पापराशी,
नसे इष्ट दाता दुजा या नराशी ७

अम्हांला सुखानें भवाब्धी तराया,
कृपेची तुझ्या नाव दे देवराया.
नसे भंगभीती अशी अन्य नाहीं,
न ती प्राप्त होतां बुडावें जनांहीं. ८

## २. प्रवासी आणि साप

एके दिवशीं एक प्रवासी घोड्यावर बसून चालला असतां रस्त्यांत वणवा पेटलेला त्यास दिसला. याच वणव्यांत सांपडण्याच्या बेतांत आलेला एक साप अगदीं दीनवाणा होऊन त्या प्रवाशास म्हणतोः "बाबारे, या भयंकर संकटांतून तूं मला वांचवशील तर मी तुझे उपकार जन्मोजन्मीं विसरणार नाहीं." मनुष्यानें असा विचार केला कीं, साप म्हणजे आपल्या जातीचा पक्का हाडवैरी. परंतु या वेळीं तो संकटांत आहे, तर त्याजवर आपण उपकार करावे, म्हणजे तो कदाचित् आपलें वैर सोडून देईल. असा विचार

करून त्यानें आपली पडशी खाली करून त्या सापास तींत बसूं दिलें. नंतर युक्तिप्रयुक्तीनें वणवा चुकवून तो सुरक्षित स्थळीं आला. तेव्हां आपली पडशी उघडून तो सापास म्हणतो: "बाबारे, तूं आतां सुरक्षित स्थळीं आला आहेस, तर पडशींतून निघून वाटेल तिकडे जा, आणि माझ्या उपकाराची फेड तुझ्या मनांत करावयाची असली, तर आजपासून तुझ्या जातीनें मनुष्यास दंश करूं नये अशी तजवीज कर, म्हणजे झालें."

तें ऐकून साप म्हणतो: "बाबारे, तुला आणखी तुझ्या घोड्याला चांगला जोरानें दंश केल्याखेरीज मी कांहीं येथून हलावयाचा नाहीं" सापाचें हें भाषण ऐकून मनुष्यास अत्यंत आश्चर्य वाटलें व त्या सापाची ती भयंकर कृतघ्नता पाहून अतिशय वाईटही वाटलें. तेव्हां तो त्यास म्हणतो: "नागोबा, अरे तूं केवढ्या संकटांत होतास, आणखी तुला मीं त्यांतून कसा सोडविला, याचें कांहीं तरी स्मरण कर."

साप म्हणतो: "तूं माझ्यावर उपकार केलेस ही गोष्ट खरी आहे. पण तसें करण्यांत तुझा मूर्खपणाच दिसून आला. ज्याचें आपलें पिढ्यानुपिढ्या हाडवैर, त्याच्यावर असे उपकार करणें, म्हणजे शुद्ध वेडगळपणा आहे. शिवाय तुम्ही माणसें नेहमीं उपकाराची फेड अपकारांनीं करतां असा अनुभव आहे. तेव्हां आम्हींही तुम्हांशीं तशाच तऱ्हेनें वागलें पाहिजे. म्हणून मी तुला डसल्याखेरीज राहणार नाहीं." त्यावरून त्यांचा वाद सुरूं झाला. तेव्हां शेवटीं असें ठरलें कीं, मनुष्यप्राणी हा नेहमीं उप-

काराची फेड अपकारांनीं करतो कीं काय हें कोणातरी पंचाकडून ठरवावें. पंचानें जर तसेंच सांगितलें तर सापानें माणसास डसावें; न सांगितलें तर सोडावें. त्याप्रमाणें ठरून दोघांनींहि एका गाईस पंच नेमलें व माणूस कृतघ्न असतो कीं काय, हा प्रश्न तिच्यापुढें मांडला तेव्हां गाय म्हणते: "माझ्या मतें मनुष्यप्राणी फार कृतघ्न आहे कारण तो आम्हांपासून दूध मिळेल तोंपर्यंत आम्हांला नीटपणें बाळगतो, आणि दूध नाहींसें झालें म्हणजे मग आमची आबाळ करून आम्हांस कोठें तरी चारणीवर सोडतो." तें ऐकतांच साप माणसास म्हणतो: "पाहिलेंस? माझ्या म्हणण्याचा प्रत्यय आला? आतां मी तुला डसणार."

तें पहातांच माणूस घाबरला; तरी पण वेळ घालवावा म्हणून म्हणतो: "बाबारे, एकाच पंचाच्या म्हणण्यावरून निकाल करूं नये. निदान दोन पंच तरी असावेत. तर आणखी कोणी तरी पंच पाहूं आणि त्याच्या म्हणण्यावर काय तो निकाल करूं." सापानें मोठ्या मिनतवारीनें तें कबूल केलें. तेव्हां त्यांनीं एका झाडास पंच नेमून त्यास तो पाहिला प्रश्न विचारला. तेव्हां झाड म्हणतें: "बाबांनो, माझा अनुभव असा आहे कीं, मनुष्यांसारखे कृतघ्न प्राणी कोणी नाहींत. ते उन्हानें तापले, म्हणजे माझ्या छायेंत येतात आणि सुख पावतात; माझीं फळें खातात, माझ्या फुलाचा वास घेतात आणि अशा तऱ्हेनें सुखसमाधान पावले, म्हणजे कोणी आपल्या कुऱ्हाडीला दांडा करण्यासाठीं म्हणून माझी एखादी फांदी तोडतो, कोणी पानें तोडून पत्रावळी लावतो, कोणी जाळण्यासाठीं फांटीं तोडतो. तेव्हां माझी तर अशी समजूत आहे कीं, माणूस अगदीं

कृतघ्न आहे.'' झालें. झाडानें असा निकाल दिल्याबरोबर मनुष्याचें धाबेंच दणाणलें आणि आतां या सापाच्या तडाक्यांतून सुटण्यास मार्गच नाहीं असें जाणून तो निराश होऊन गेला. परंतु जिवाच्या आशेनें कसा तरी आणखी वेळ काढावा म्हणून युक्ति शोधण्यास तो डोकें खाजवीत होता इतक्यांत एक कोल्हा तेथें आला. त्यानें मनुष्यास व सापास पहातांच म्हटलें: ''अरे माणसा, तूं कोणचें असें या सापाचें अहित केलें आहेस, कीं ज्याच्यामुळें तो तुझा घात करतो आहे?''

मनुष्यानें त्यास आपली हकीकत सांगितली तेव्हां कोल्हा म्हणतो: ''मला तर बोआ तुझी सगळी गोष्टच खोटी वाटते. कारण सर्पोजीबोआ केवढे तरी आहेत, ते तुझ्या पडशींत शिरून बसले तरी कसे? ते बसले असतील हें संभवनीयच नाहीं. तेव्हां त्यांनीं तुझ्याजवळ मदत मागितल्यावर तूं पडशी खालीं केलीस कशी, साप आंत शिरला कसा, हें सर्व जर पुनः मला प्रत्यक्ष दाखवाल तर मी पुढें काय निकाल द्यावयाचा तो देईन.'' कोल्होबाचें हें बोलणें ऐकून सापदादा एकदम म्हणतातः ''मी कसा आंत शिरून बसलों होतों तें आत्तां दाखवीन; त्यांत काय आहे?'' असें म्हणून तो पटकन् त्या प्रवाशाच्या पडशींत शिरला त्याबरोबर कोल्हा माणसास म्हणतो: '' बाबारे, पहातोस काय आतां? पडशीचें तोंड बांधून तीवर एक भला थोरला धोंडा टाकून सापास मारून टाक. असल्या दुष्ट शत्रूशीं वाद घालीत बसण्यांत अर्थ नाहीं. तो सांपडेल तेथें त्याला ठेंचलेंच पाहिजे. उपकार करावयाचा तो तरी योग्यायोग्य विचार करून केला पाहिजे.''

प्रवाशानें कोल्ह्याचा उपदेश घेऊन आपली सुटका करून घेतली.

## ३. विद्येची भूपाळी

प्रभात झाली गडे, उगवला गगनीं वासरमणी
चला शिकूं या आनंदानें विद्या सगळ्याजणी ॥ ध्रु० ॥

गंगा यमुना गोदावरी
तीर्थे पावन हीं भूवरी
परी न विद्येची या सरी
मानसमलहरणी. १

विद्या शिकवी व्यवहार
सत्य न्याय सदाचार
जगांत विद्या गुरु थोर
अज्ञानोद्धरणी २

मातापितरां बंधूजनां
विनवुनि वळवूं त्यांच्या मना
तत्साह्यानें विद्याधना
घेऊं संपादुनी ३

महत्कार्य हें साधाया
नमन करूं या प्रभुराया
ईशकृपेविण सारे वाया
प्रयत्न या भुवनीं. ४

## ४. मुल्ला अहमदाची सून

**स्थळः**— कल्याण शहराबाहेर मराठ्यांचा तळ.

( १६४८ )

एक सरदारः—चला, मनांत धरल्याप्रमाणें ही मोहीम फत्ते झाली. आतां महाराजांची स्वारी येऊन दाखल झाली म्हणजे केल्या कामाचें चीज झालें.

आबाजी सोनदेवः—इतक्यात येतीलच. हिसाब किताब सर्व तयार असूं द्या. धांदलीचे दिवस. स्वारी ताबडतोब पुढें दक्षिण-कोंकणांत जाईल असा रंग दिसतोय्

सरदारः— होय बुवा. गेल्या दोन तीन वर्षांत महाराजांना विसावा कसा तो माहीत नाहीं. तोरणा हस्तगत झाला नाहीं तोंच राजगड बांधून काढला मोहितेरावांना दस्त करून सुपें महाल साधिला नाहीं तोंच परवां पुरंदरचें राजकारण केलें. दादाजीपंत हें पहायला हवे होते.

आबाजीः— गेले. असा इमानी व कर्तबगार पुरुष होणें नाहीं. नऊ दहा वर्षांत मुलुखाला रौनक आणिली. आणखी थोडे जगते तर कौतुक करते. ( पुढें जातात. )

[ शिवाजी महाराज निवडक माणसांसह येतात. ]

शिवाजीः—आबाजी, तुमचा रोखा पावला. तुमची बहाद्दरी ऐकून संतोष झाला. तुमची ही कल्याणभिवंडीची मोहीम म्हणजे आदीलशाहीशीं उघड दाव्याची सुरवात; ही पहिली सलामी. बरें मुल्ला अहमदची कांहीं नवी खबर ?

आबाजीः—कांहीं नाहीं. मुल्लाजी विजापुरींच आहेत. महंमद-शहांची प्रकृति बिघडल्यापासून ते दरबारींच गुंतून राहिले आहेत. हा सुभा कल्याण-भिवंडीपासून नागोठण्याच्या खाडीपर्यंत पसरलेला; पण बंदोबस्त यथातथाच होता. जुने दरखदार खोत वैगेरे लोक बेदिल. आम्हीं येऊन कौल देतांच साहेबसेवेस रुजू झाले. सर्व प्रताप स्वामींच्या पुण्याचा. नाममात्रेंच लोक वश होतात सेवकाचा त्यांत मोठेपणा नाहीं.

शिवाजीः—( हसून ) आम्ही नाममात्रच आहोंत, कर्ता करविता धनी वेगळाच आहे. हें हिंदवी राज्य, श्रीचा यावर वरद-हस्त. नामस्मरण करून जेथें जाल तेथें फत्ते पावाल. मोठमोठ्या अमिरांना तालेवार व्हाल. हें श्रीचें देणें. हे पहा तळकोंकणांतले रोखे. तिकडील रयत हबशांच्या जुलुमानें गांजलेली; आम्हांला तिकडे बोलावीत आहेत. तळा, घोसाळा वैगेरे किल्ले व खालचा मुलूख देऊं म्हणतात. त्यांना ही बुद्धि कोणी दिली ? ही मसलत आतां हातीं घेणें आहे. साधल्यास दक्षिण कोंकण हाताशीं येईल. आतां वेळ नाहीं. या मोहिमेंत काय प्राप्ती झाली ? खजिना लुटलात त्यांत पैसा किती होता ? सर्व हिशेब द्या.

आबाजीः—मोजदाद करून सर्व हिशेब करून ठेवला आहे. लुटींत एक सुंदर स्त्रीरत्न लाभलें तें दाखविण्यास आणतों. ती मुल्ला अहमदाची सून आहे. बहुत सुंदर, लावण्यवती; महाराजांच्या सेवेला योग्य जाणून ठेविली आहे.

शिवाजी:—असें, असें. आणा पाहूं. ( आबाजी जातो. ) ( स्वगत ) बाळपणापासून वागत आले, पण अद्याप आमची ओळख पटली नाहीं. हा मोका ठीक आहे.

[ आबाजी त्या स्त्रीला घेऊन येतो ]

शिवाजी:— ( तिला ) बाई, जरा बुरखा एकीकडे सारा बरें. ( ती बुरखा सारते ) ओ हो! छान आबाजी, ब्रह्मदेवाची काय करामत आहे ! वाहवा, बहुत योग्य, बहुत योग्य.

आबाजी:— ( आनंदानें ) महाराजांना वस्तु आवडेल अशी उमेद होती.

शिवाजी:— वा छान आबाजी, आमच्या मासाहेब इतक्या सुंदर नाहींत, नाहीं बरें ?

आबाजी:—( आश्चर्यानें ) म्हणजे महाराज, मी नाहीं समजलों.

शिवाजी:— नाहीं आबाजी, या बाईकडे पाहिलें तेव्हां आम्हांला वाटलें, इचें लावण्य इतकें, असेंच आमच्या मातोश्रीचें असतें तर आमचेंहि स्वरूप असेंच झालें असतें. पुण्यास गेल्यावर आम्ही मासाहेबांस सांगतों: " पुढच्या जन्मीं तुम्ही अशाच सुंदर व्हा." आबाजी, मान कां खालीं घातली ? परस्त्रीच्या शापानें आम्हांला नरकांत पोहोंचविण्याची मसलत तुम्हांला कशी सुचली ? आबाजी, हिंदवी स्वराज्याचा हा उद्योग कोणासाठीं चालला आहे ? बायाबापड्यांसाठीं; गोब्राह्मणांसाठीं; यांचा उद्धार, यांचें रक्षण, हा या उद्योगाचा पाया तुम्ही तो आज लाथाडूं पाहात होतां. या बाईंना साडीचोळी लेवून आपल्या सासरीं जाऊं द्या. बरोबर माणसें देऊन विजापुरास यांची रवानगी करा. माई,

जा तुम्ही. तुमच्या गोषाची बेअदबी झाली. माफ करा. मी तुमचा भाऊ; साडीचोळी लेवून आपल्या सासरीं जा. आबाजी न्या त्यांना.

[ ती स्त्री खालीं पहात अश्रु ढाळीत जाते. ]

आबाजी:—महाराज, सेवक अपराधी आहे. क्षमा करावी. जें केलें त्यांत स्वामीसेवेशिवाय विचार नव्हता.

शिवाजी:——तुमचा भाव आम्ही जाणून आहों तुम्ही श्रमी होऊं नका. त्यांत तुमचा दोष नाहीं. तुम्हीं आम्हांला पुरतें ओळखिलें नव्हतें. तुम्ही सर्वजण ध्यानांत ठेवा. आमच्या राज्यांत स्त्रिया, साधु-संत व देवस्थाने यांची बेअदबी झालेली आम्हांस चालणार नाहीं, मग तीं कोणत्याही धर्माचीं असतना! आबाजी, तुम्हांला आम्ही या कल्याण प्रांताची सुभेदारी देतों. या प्रांतांत देवस्थानें असतील त्यांची पूजा, नैवेद्य, नंदादीप यांची व्यवस्था करा मशिदी, दरगे असतील त्यांची काळजी घ्या देवांचे उत्सव व पिरांचे उरूस चालू ठेवा. तुमच्या सुभायतींत जे किल्ले असतील त्यांवर विश्वासू माणसें ठेवा; त्यांत दारुगोळा, लाकूडफांटा, अडेसरी यांचा धारा बांधून द्या. किल्ल्यांचे तट जेथें सोपे असतील, तेथें तासून सुरूंग लावून बेलाग करा. रयतेला कौल देवून जमिनींची लागवड करा

आबाजी:——जशी महाराजांची आज्ञा. ( मुजरा करतात. )

### ५. मावळ्यांचें गाणें

चला रायगडा, शिवरायाचं दर्सन घेऊं ॥ ध्रु० ॥

ठेवुन् म्होरलं धोरन
ज्येनं बान्दलं तोरन
संग घेवून मावळ भावू.



मावळ्यांचें गाणें

घेवुन् गडी दम्‌दार
केलं दुस्मन ठार
    त्येची युगत शिकाया जावूं.

बारामावळ रान
धरमाचं निशान
    ज्येनं रोवलं घेवून ठावूं.

बान्दुन्‌श्येनी आर्‌मार
घेर्‌ला समिन्दर्‌ पार
    त्येच्या नौकची किरत गावूं.

आई भनी समान
परनारीस मान
    ज्येनं देवून मिळवलं नांवं.

मायबोलीचा जोर
करि दरारा थोर
    त्येचा पवाडा ऐकत न्हावूं.

भगवा झेण्डा फिरवून
जरिपटका मिरवून
    झाला समशेरीवर जो रावू.

म्हराठ्यांचा बाणा
गेला गाजवून राणा
    त्येच्या समाधीवर फुलं वाहूं.

## ६. शकुन

धूर निघतांना दृष्टीस पडला कीं, तेथें अग्नि आहे असें समजा-वयाचें; त्याप्रमाणें पाऊस पडतांना दिसला कीं तो ढगांतूनच पडत आहे, असें समजावयाचें; हें सुसंगत आहे ह्यांत विसंगत कांहीं नाहीं तथापि, अग्नि असला कीं त्यापासून धूर निघालाच पाहिजे, अथवा ढग आला कीं त्यांतून पाऊस खाचित पडावयाचाच, असा उलट नियम बांधतां येत नाहीं. कां कीं, धूर आणि पाऊस हीं कार्यें आहेत, आणि अग्नि आणि ढग हीं कारणें आहेत, तीं कार्यें ह्या कारणांवांचून व्हावयाचीं नाहींत, हें खचित आहे, परंतु, कारणें आहेत, तीं कदाचित् कार्यें न करितां तशींच राहूं शकतील

चंद्र उगवणें आणि समुद्रास भरती लागणें हीं दोन्हीं एकदम होतात; तेव्हां तेथें दोन प्रश्न उत्पन्न होतात. त्यांतला पहिला प्रश्न हा कीं, चंद्र उगवल्याच्या योगानें समुद्रास भरती लागते कीं काय? आणि दुसरा हा कीं, समुद्रास भरती लागल्याच्या योगानें चद्र उगवतो कीं काय? ह्यांचा उलगडा विचारानेंच केला पाहिजे. तथापि, ह्या दोन गोष्टींचा संबंध एकमेकींशीं अगदीं निकट आहे, ह्यात कांहीं संशय नाहीं.

तशा प्रकारें, कांहीं अंशीं, शकुनांचा आणि लाभहानीचा संबंध अगदीं निकट आहे, असें कांहीं लोकांच्या मनांत भरून गेलेलें असतें. म्हणजे, शकुन हे बऱ्यावाईट भावी गोष्टींचे सूचक आहेत, असें त्यांस वाटतें. घरांतून बाहेर पडतांना, कोठें जातां असें विचारणें, मांजर आडवें जाणें, विधवा स्त्री किंवा बोडका माणूस समोर भेटणें, इत्या-

दिकांस अपशकुन मानितात. आणि चास पक्षी डावा जाणे, सुवासिनी स्त्री आपल्या मुलासहवर्तमान पुढें भेटणें, स्नानसंध्याशील ब्राह्मण आंगरखापागोटें घातलेला समोर येणें, इत्यादिकांस शुभ शकुन मानितात ह्याचा अर्थ असा कीं, एखाद्या कार्यास घरांतून निघतांना जर ते अपशकुन झाले, तर तें कार्य व्हावयाचें नाहीं, आणि हे शुभ शकुन झाले म्हणजे तें कार्य खचित उत्तम प्रकारें व्हावयाचें असें समजतात. परंतु हे दोन्ही प्रकारचे शकुन आणि कार्ये ह्यांचा कांहींच खरा संबंध नाहीं म्हणजे, शुभ शकुन झाले कीं कार्य खचित व्हावयाचेंच, किंवा अपशकुन झाले कीं कार्याचा बिघाड खचित व्हावयाचाच, असा अनुभव नाहीं; त्याप्रमाणेंच, कार्यसिद्धि व्हावयाची असली कीं शुभ शकुन व्हावयाचेच, अथवा कार्य बिघडावयाचें असलें कीं, अपशकुन हटकून व्हावयाचेच, असाही अनुभव नाहीं. म्हणजे, अमुक एक प्रकारें शकुनांचा आणि कार्याचा संबंध आहे, असें दिसत नाहीं. म्हणून, विचारी पुरुषांस असें वाटतें कीं, शकुनांवर भरंवसा ठेवणें हें चांगलें नाहीं. आणखी, माणसें काय आणि राष्ट्रें काय, जसजशीं अधिकाधिक ज्ञानसंपन्न होतात, तसतसा त्यांच्या मनांतला शकुनांवरचा विश्वास उडत जातो. साधुशिरोमणि रामदास ह्यांनीं देखील एका ठिकाणीं म्हटलें आहे:—

सांगों जाणती शकुन । भूत भविष्य वर्तमान ॥
त्यांचा आम्हांसी कंटाळा । पाहों नावडती डोळां ॥

ह्या उक्तीचें पर्यवसान आम्ही म्हणतों तिकडेच आहे.

शकुनासारख्या गोष्टींचा भ्रम वेळेस थोडक्या उपायानें देखील नाहींसा होतो. एक तार्तार सरदार, मोठ्या घोड्यावर बसून मोठ्या

पहांटेस काहीं कामाकरितां घराबाहेर पडत असतां, एक म्हातारा बोडका माणूस पुढें आला; त्याला पाहून त्या सरदाराचें मन किंचित् कचरलें. तरी तो तसाच पुढें गेला. नंतर कांहीं वेळानें त्या सरदाराचा घोडा बुजून दांडगाई करूं लागला; त्यासरसा तो सरदार त्यावरून खालीं पडला, आणि त्याला फार दुखापत झाली. तेव्हां त्यास त्या बोडक्या मनुष्याच्या अपशकुनाची आठवण होऊन त्यानें त्याला लागलेंच पकडून आपणासमोर आणविलें, आणि त्याला एकदम फांशीं देण्याचा हुकूम केला; आणखी त्याजकडे पाहून म्हटलें : " आज सकृद्दर्शनीं मीं तुझें तोंड पाहिलें त्यामुळें मला ही इतकी पीडा झाली. ह्यावरून तूं मोठा पापी असावास. तुला मरणाचीच शिक्षा योग्य आहे." तें ऐकून तो वृद्ध मनुष्य हात जोडून त्यास म्हणाला: " महाराज, आतां मी तर मरावयास तयार झालोंच आहे. पण, मला थोडें बोलण्याची परवानगी असावी."

सरदार—बोल काय बोलायचें असेल तें.

म्हातारा—महाराज, माझें तोंड आपण आज पहिल्याने पाहिल्यामुळें आपणांस एवढी दुखापत झाली, तेव्हां मी तर मोठा पापी खराच; पण, आपलें तोंड मीं आज प्रथम पाहिल्यामुळें मला मृत्यूची शिक्षा झाली आहे; तेव्हां आपण किती पापी असाल बरें ! अधिकोत्तराची क्षमा असावी, महाराज.

हें उत्तर ऐकतांच त्या सरदाराच्या अंतःकरणांत उजेड पडला, आणि त्याचा वेडेपणा त्यास चांगला दिसून येऊन, त्यानें त्या म्हाताऱ्या माणसास सोडून दिलें; आणि तेव्हांपासून तो सरदार

शकुन खरे मानीनासा झाला. शकुन जर खरे असते, तर पुढें होणाऱ्या फार मोठ्या वाईट गोष्टी मनुष्यास अनायासें टाळितां आल्या असत्या. पानिपतच्या लढाईवर जातांना अपयशसूचक अपशकुन झाले असते व पेशव्यांनीं तो संग्राम हरप्रयत्न करून टाळिला असता, आणि त्या टाळण्यानें सहस्रावधि माणसांचे जीव बचावले असते पण ती सगळी भ्रांति असल्यामुळें, तिजकडे शहाण्या पुरुषांनीं लक्ष दिलें नाहीं ह्यांत कांहीं विशेष नाहीं

असा विचाराचा प्रकाश अंतःकरणांत पडला पाहिजे म्हणजे, भ्रांतीचा आणि अज्ञानाचा अंधकार आपोआप नाहींसा होतो. आणखी हा प्रकाश प्राप्त करून घेण्याचें मुख्य साधन म्हटलें म्हणजे, कार्याचीं खरीं कारणें जाणणें हें आहे ह्यास्तव तीं खरीं कारणें शोधण्याचा प्रयत्न करीत असावें.

## ७. ऊठि गोपालजी

ऊठि गोपालजी, जाइ धेनूकडे
पाहती सौंगडे वाट तूझी ॥ ध्रु० ॥
लोपली हे निशी मंद झाला शशी
मुनिजन मानसीं, तूज ध्याती १
भानुउदयाचळीं तेज पुंजाळलें।
फुललीं कमलें उदकीं हीं २
धेनु वत्सें तुला बाहती माधवा
ऊठि गा यादवा उशीर झाला ३

ऊठि, पुरुषोत्तमा, वाट पाहे रमा ।
दावि मुखचंद्रमा, सकळिकांसी ४

कनकपात्रांतरीं दीपरत्नें बरीं ।
ओवाळिते सुंदरी तूजलागीं ५

जन्मजन्मांतरीं दास होऊं हरी
बोलती वैखरी भक्त तूझे ६

कृष्णकेशव करीं चरणांबुज धरी
ऊठ गा श्रीहरी मायबापा ७

## ८. घुसृणेश्वर

वेरूळजवळ घुसृणेश्वर नांवाचें शंकराचें स्वयंभू स्थान आहे. ह्या ठिकाणीं मोठे उत्सव होत असून दूरदूरचे लोक दर्शनास येतात. अशींच आणखी अनेक ठिकाणे महाराष्ट्रांत सह्याद्रीच्या शिखरांवर असून निरानिराळ्या कुटुंबांकडून त्यांस इनामें मिळत गेलीं व उत्सव होऊं लागले. त्र्यंबकेश्वर, भीमाशंकर, महाबळेश्वर, सिंघणेश्वर अशीं पुष्कळ शंकराचीं स्थानें महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहेत निर-निराळ्या प्राचीन राजांनीं त्यांची स्थापना केली आणि अद्यापि त्यांचें महत्त्व लोकांत चालू आहे.

घुसृणेश्वराचें मंदिर देवगिरीच्या यादवांनीं बांधिलें आणि तेथील देवास 'घुसृण' म्हणजे केशराची उटी लावण्याचा प्रघात घातला. यादवांचें राज्य मुसलमानांनीं जिंकिल्यावर, त्यांच्या आश्रयास राहणारीं अनेक कुटुंबें देशोधडीस लागलीं; आणि

त्यांच्या वंशजांस निर्वाहाची पंचाईत पडून ते रानावनांत भटकून संकटानें पोट भरूं लागले. पूर्वजांचे पराक्रम आठवून त्यांस भारी दुःख होत असे. आपल्या पूर्वजांनीं मोठमोठीं राज्यें केलीं, संपात्ति मिळविली, मंदिरें बांधून देवतांची स्थापना केली, डोंगरांतील खडकांत प्रचंड गुहा व मंदिरें खोदून धर्माचें व कलांचें संरक्षण केलें, हे प्रकार त्यांचे नजरेसमोर होते. परंतु मुसलमानी राज्य झालें तेव्हां त्यांस उद्योगाचें पूर्वींचें साधन राहिलें नाहीं, आणि त्यांस अत्यंत विपत्ति प्राप्त झाली

गंगादेवी नांवाची एक कुलीन मराठा घराण्यांतील पोक्त बाई निराश्रित होऊन घुसृणेश्वराच्या सेवेस येऊन राहिली. तरुणपणींच वैधव्य येऊन, तिचे आप्त वगैरे कोणी राहिले नव्हते. त्या काळचें सर्व शिक्षण गंगादेवीस लहानपणीं मिळालें होतें. पोथ्यापुस्तकें वाचून व कथापुराणें ऐकून तर्कानें संस्कृत भाषाही तिला थोडीबहुत समजत असे. गाणीं, कवनें, स्तोत्रें वगैरे तिला पुष्कळ पाठ येत असत. सत्तेचा राहता वाडा देखील मोडून पडूं लागला, तेव्हां संसारांत कोणतीच उमेद तिला राहिली नाहीं. म्हणून उरलेलें आयुष्य ईशसेवेंत घालवावें अशा निश्चयानें ती या घुसृणेश्वराच्या मंदिरांत येऊन राहिली.

या मंदिराचा लौकिक मोठा होता. साधु, बैरागी, तपस्वी वगैरे देशोदेशींचे प्रवासी या ठिकाणीं दर्शनास येत. त्यांच्या तोंडून देवादिकांच्या व सत्पुरुषांच्या कथा ऐकाव्या व भजनपूजन करून काळ कंठावा, असा क्रम गंगादेवीनें चालविला. मात्र पूर्वींचें वैभव तिला माहीत असल्यामुळें मनांत निदिध्यास एकच कीं आपल्या

लोकांचें दैन्य नाहींसें कसें होईल ! अशा रीतीनें तिचीं कैक वर्षें गेलीं, आणि तिला आतां वृद्धावस्था आली. तरी कोणी तसाच सत्पुरुष भेटला, म्हणजे त्यास ती अत्यंत कळवळ्यानें मनांतला हेतु विचारीत असे अशा एका विद्वान् साधुपुरुषाशीं तिचा परिचय जडला, तेव्हां ओघाओघानें तिनें आपल्या मनांतील विवंचना त्यास कळविल्या; त्या वेळीं दोघांचे संभाषण झालें तें असें:—

साधु:– बाई तुम्ही चिंता करूं नका. सर्व दिवस सारखे राहतात असें नाहीं. सद्भावनेनें उद्योग करणारास परमेश्वराचें साह्य ठेवलेलें असतें. त्याला सर्वांची काळजी आहे, आणि सर्वांचा भार तोच वाहतो. तुमच्यासारख्या तपस्विनींची सेवा कधीं फुकट जावयाची नाहीं या महाराष्ट्र देशावर भगवंताची मोठी कृपा आहे

गंगादेवी:– महाराज, हें आपण कशावरून म्हणतां ? या देशाची पूर्वस्थिति आपणांस माहीत आहे काय ?

साधु:– अलबत्, मला सर्व ठाऊक आहे. येथें पूर्वी रठे नांवाचे लोक राहत होते. ते पराक्रमी झाले तेव्हां त्यांचें नांव महारठे असें पडलें. त्यांनींच ह्या देशाची वस्ती केली, म्हणून यास महाराष्ट्र असें नांव मिळालें. भाषेचें नांव मराठी पडण्याचें कारणही तेंच. पूर्वी येथें अनेक पराक्रमी राजवंश झाले. शालिवाहन, चालुक्य, राष्ट्रकूट, यादव, शिलाहार, कदंब अशा अनेक वंशांचीं राज्यें महाराष्ट्रावर झालीं. त्यांच्या टोलेजंग राजधान्या ठिकठिकाणीं होत्या, त्यांचे पडके भाग अद्यापि दृष्टीस पडतात. डोंगरांत अनेक जागीं प्रचंड लेणीं आहेत तीं या पूर्वींच्या राजांनींच खोदविलीं. महाराजाधि-

राज, प्रतापचक्रवर्ति, समस्तभुवनाश्रय, अशा भपकेबाज पदव्या या राजांनीं धारण केल्या होत्या. चालुक्य राजा पुलकेशी व त्याचा मुलगा विक्रमादित्य हे विशेष पराक्रमी झाले. यादव वंशांतही सिंघण, रामदेवराव वगैरेंनीं मोठी कीर्ति मिळविली. सिंघणापुरचा महादेव या सिंघण राजानेंच वसविला. प्रसिद्ध साधु ज्ञानेश्वर, यादवांचा प्रधान हेमाडपंत, ज्योतिषी भास्कराचार्य, असे थोर पुरुष जेथें निपजले, त्या राष्ट्राची थोरवी किती म्हणून सांगावी !

गंगादेवीः— महाराज, हा पूर्वींचा प्रकार झाला, परंतु पुढें आतां या देशाचें भाग्य उदयास येईल अशीं कांहीं चिन्हें आपणांस दिसतात काय ?

साधुः— बाई, मी सर्वत्र हिंडून देशस्थिति पहात आहें, त्यावरून मला खात्री वाटते कीं, या देशाचा भाग्यकाल नजीक आला आहे. प्राचीन थोर घराण्यांचा संहार झाला, असें तुम्हांस वाटतें तें बरोबर नाहीं. तीं कुटुंबें आज ठिकठिकाणीं धैर्यानें उद्योग करून पुढील उदयाची तयारी करीत आहेत. त्यांच्या अंगचें पाणी बिलकूल कमी झालेलें नाहीं. कोणी तरी पुढारी मिळावा एवढीच वाट ते पहात आहेत.

गंगादेवीः— परंतु धर्म व नीति बिघडल्यामुळें आपला पुढें उद्धार होईल कीं नाहीं, याबद्दल मला मोठी शंका वाटते.

साधुः—धर्म बुडत चालला असें तुम्हांस वाटतें तेंही बरोबर नाहीं. मंत्रतंत्र, व्रतें, अनुष्ठानें, जातिद्वेष वगैरेचें खूळ धर्माच्या नांवाखालीं समाजांत वाढलें, तेव्हां नामदेव, एकनाथ, तुकाराम अशा थोर संत

पुरुषांनीं आपल्या जोरदार वाणीनें व निर्मळ आचरणानें लोकांच्या डोळ्यांत चरचरीत अंजन घालून नीतीचा व धर्माचा खरा मार्ग त्यांस दाखवून दिला आहे. मोठमोठे कर्मठ ब्राह्मण सुद्धां या साधूंच्या पायांवर लोटांगणें घालतात, तीं उगाच काय ?

गंगादेवी:—परंतु या कामास परमेश्वराचें साह्य पाहिजेना ? त्याचे साह्याशिवाय काय होणार ?

साधु:—म्हणूनच तर तुम्हांला व मला अशा प्रकारें ईशसेवा करण्याची बुद्धि झाली. बाई, तुम्ही कांहीं चिंता करूं नका. अशाच निष्ठेनें ईशसेवा करीत जा, म्हणजे देशाचा उद्धार होईल.

गंगादेवी पुढें फार दिवस वांचली नाहीं. परंतु भोसल्यांचे कुळांत शहाजी व त्याचा मुलगा शिवाजी यांचा उदय होऊन ते राष्ट्रोद्योग करूं लागले ही वार्ता कानांवर येऊन मोठ्या समाधानानें तिनें प्राण सोडिला.

## ९. अतुल स्वार्थत्याग

शिवाजी दिल्लीस औरंगजेबाच्या भेटीस गेला असतां, त्यास त्यानें कैद केलें परंतु तो युक्तीनें निघून दक्षिणेंत आला ही हकीकत सर्वप्रसिद्धच आहे. पण मध्यंतरीं एक चमत्कारिक गोष्ट घडली ती अशी:—

शिवाजी दिल्लीहून निघाला त्या वेळीं त्याजबरोबर त्याचा मुलगा संभाजी व त्याच्या जिवास जीव देणारे त्याचे परम मित्र येसाजी कंक व तानाजी मालुसरा हे होते. हे चौघेही गोसाव्याच्या वेषानें येत होते. तथापि शिवाजीस जो पकडून देईल त्यास दोन हजार

होन बक्षीस मिळतील अशी दवंडी औरंगजेबानें पिटविली असल्या-मुळें मुलूखभर त्याच्या शोधावर लोक होते; यामुळें शिवाजीस वाटलें कीं, आपण चौघे एकदम चाललों असतां घात होण्याचा सभंव आहे. म्हणून त्यानें तानाजी व येसाजी यांस सांगितलें कीं, "मी निराळा मागून येतों. आपण सर्वजण दक्षिणेंत सुखरूप पोहोंचलों तर बरेंच, नाहींपेक्षां कदाचित् माझें जरी कांहीं बरेंवाईट झालें तरी हरकत नाहीं, तुम्ही संभाजीस गादीवर बसवून माझे हेतु शेवटास न्या म्हणजे झालें."

परंतु ही गोष्ट शिवाजीचे सोबत्यांस रुचली नाहीं. यास्तव ते सर्वजण एकत्रच निघून चालले. पण पुढें असें झालें कीं, ते मूर्शिदाबादे-नजीक आल्यावर एका झाडींतून चालले असतां एक मोठा वाघ त्यांच्यावर चालून आला शिवाजीनें आपल्या दोघां सोबत्यांस संभाजीला संभाळण्यास सांगून आपल्या सोट्यानिशीं वाघाचा समा-चार घेण्याचा निश्चय केला. त्याचें धैर्य व शौर्य विलक्षणच! वाघ अंगावर आल्याबरोबर त्यानें आपला सोटा इतक्या जोरानें त्यास मारिला कीं, तो व्याकुळ होऊन गेला. परंतु पुनः दोन तीन वेळ अवसान धरून तो आणखी चाल करून आला. तेव्हां शिवाजी त्यास पाहिल्या प्रमाणेंच रट्टा लगावीत असतां त्याच्या सोट्याचे दोन तुकडे झाले! त्या-वरून वाघास फारच आवेश आला, व त्यानें जास्त अवसानानें शिवाजीवर उडी घातली. इतक्यांत तानाजी धांवत आला व त्यानें वाघास आपल्या सोट्याचा असा एक रट्टा दिला कीं, तेणेंकरून तो भिऊन पळून गेला. तो पुनः आला नाहीं, परंतु वाघाचे शेवटचे उडीचे वेळीं त्याचा पंजा शिवाजीच्या डाव्या खांद्यास लागून त्यास

भयंकर जखम झाली. तेव्हां तानाजीनें पाणी आणिलें, व येसाजीस जखमेवर कांहीं झाडपाल्याचें औषध माहीत होतें, तो झाडपाला आणण्याकरितां तो निघून गेला. सुदैवानें त्याला लवकरच तो पाला सांपडला. मग त्यांनीं ती जखम धुवून बांधिली.

नंतर हळूहळू ते मूर्शिदाबादेस गेले. तेथें जाऊन थोडा वेळ झाला नाहीं तों शिवाजीस सडकून ताप आला. तेव्हां सर्वजण अगदीं घाबरून गेले. काय करावें तें त्यांस सुचेना. उघड्या हवेंत राहून अशा प्रसंगीं भलतेंच व्हावयाचें. बरें, कोणाच्या घरीं बिऱ्हाड घ्यावें, तर तें मिळण्याचीही पंचाईतच. बिऱ्हाडही मिळालें, पण कदाचित् आपल्या तोंडून एखादा शब्द चुकून बाहेर पडला, व आपण कोण हें प्रसिद्ध झालें, तर प्राणाशीं गांठ पडणार, अशी त्यांना चोहोंकडून पंचाईत येऊन पडली. परंतु काय होईल तें होवो, बिऱ्हाड कोठें तरी पाहिलें पाहिजे, असा त्यांचा शेवटीं निश्चय झाला. त्यांनीं पुष्कळांची विनवणी केली, परंतु जागा कोणीही देईना. शेवटीं विनायक देव या नांवाचा कोणी महा-विद्वान् व दयाशील ब्राह्मण त्यांस भेटला. त्यानें आपल्या घरांत त्यांची सोय केली. हा ब्राह्मण मूळचा गृहस्थाश्रमी होता; परंतु त्याजवर कांहीं भयंकर प्रसंग आल्यामुळें त्यानें वैराग्य धारण केलें होतें, व कोरान्न मागून तो उपजीविका करीत असे. त्याच्या घरांत फक्त एक त्याची आई होती; तिची शुश्रूषा करण्यांत व होईल तितका परोपकार करण्यांत तो निमग्न असे.

या ब्राह्मणाचे घरीं शिवाजीचे प्रकृतीस आराम पडूं लागला. पण प्रकृति साफ बरी होण्यास बराच अवधि लागेल, तेव्हां आपल्या-

मागें आपण उभारलेल्या राज्याचा पाया ढासळूं नये म्हणून शिवा-जीनें तानाजी व येसाजी यांस सांगितलें कीं, तुम्ही आतां येथें क्षण-भरही न राहतां संभाजीस घेऊन दक्षिणेंत गेलेंच पाहिजे. हें त्याचें बोलणें हेकून ते फार कष्टी झाले; कां कीं, शिवाजीस तशा स्थितींत टाकून जाणें त्यांच्या अगदीं जिवावर आलें. परंतु त्याची आज्ञा त्यांस शिरसावंद्य, सबब त्यांनीं ती गोष्ट मान्य केली. तथापि त्या दोघांनीं आपसांत अशी तोड काढिली कीं, येसाजीनें संभाजीस घेऊन जावें, व तानाजीनें मूर्शिदाबादेस, शिवाजीस नकळत कारण पडल्यास त्याच्या साह्यास रहावें. मग त्यांनीं विनायक देवास सांगि-तलें कीं, ‘ आम्ही तिघे ( येसाजी, तानाजी व संभाजी ) कांहीं नवस फेडण्यासाठीं काशीस जाऊन येतों, तर तोंपर्यंत आमच्या ह्या भावास ( शिवाजीस ) कृपा करून संभाळा. ’ असें म्हणून ते त्याच्या घराबाहेर पडले.

ब्राह्मण नित्य भिक्षा मागून आणून आपला, मातुश्रीचा व शिवाजीचा निर्वाह करीत असे. एकदा ब्राह्मणास फार थोडी भिक्षा मिळाल्यामुळें, त्यानें अन्न शिजवून आईस व गोसाव्यास वाढिलें व आपण उपाशीच राहिला. ही गोष्ट शिवाजीच्या नजरेस आल्यावरून त्यास परम दुःख झालें. तो मनांत म्हणाला, ‘ ब्राह्म-णांचा प्रतिपाल करणें हें माझें ब्रीद असतां मला खायला घालून ब्राह्मणानें उपाशी रहावें हें अनुचित होय. आजपर्यंत यानें मज-करितां असे किती उपवास काढिले असतील कोण जाणे ? ’ हे विचार मनांत येऊन तो फार कष्टी झाला. मग ह्या धन्य पुरुषाचे उतराई कसें व्हावें व याचें दारिद्र्य कसें दूर करावें हा विचार एकसारखा त्याच्या

मनांत घोळूं लागला. पण या गोष्टीची कांहींच तोड त्याला सुचेना. आपण यास दक्षिणेंत बरोबर घेऊन जावें तर हा वृद्ध मातुश्रीसह येतो कसचा ? बरें, आपण तेथें पोहोंचल्यावर यास द्रव्य पाठवून द्यावें, तर आपण संकटांतून निभावून दक्षिणेंत पोहोंचूं याचा नेम काय ? तेव्हां त्या थोर पुरुषास एक विलक्षण कल्पना सुचली. त्या ब्राह्मणाकडून लिहिण्याचें साहित्य मागवून त्यानें एक लखोटा लिहून तयार केला. तो घेऊन तेथील सुभेदाराकडे जाण्यास त्यानें ब्राह्मणास सांगितलें. सुभेदाराच्या हातीं लखोटा गेल्यावर त्यानें तो फोडून पाहिला, तों त्यास पुढील मजकूर त्यांत आढळला. "शिवाजी या ब्राह्मणाचे घरीं आहे. त्याच्याबरोबर या आणि त्यास खुशाल पकडा. मात्र जाहीर केलेलें दोन हजार होनांचें बक्षीस या ब्राह्मणास दिलें पाहिजे. ब्राह्मणास बक्षीस न देतां विश्वासघात करून जर शिवाजीस धरण्याचा यत्न कराल, तर मात्र पश्चात्ताप पावाल." अहाहा ! केवढी तरी त्या महात्म्याची थोरवी ! आतां हें पत्र लिहिण्यापूर्वीं एक गोष्ट त्याच्या मनांत आली. ती ही कीं, आपल्यामागें आपण आरंभिलेल्या कामाचें कसें होईल. पण लागलाच त्यानें विचार केला कीं, संभाजी सुरक्षित दक्षिणेंत पोहोंचला तर ठीकच आहे, पण तसें दुर्दैवानें नच झालें तरी देशाचें नष्टचर्य संपलें असल्यास दुसरा कोणी आपणासारखा किंवा आपल्याहूनही जास्त योग्यतेचा पुरुष निपजून तें कार्य तडीस नेईल.

असो, पत्र वाचतांच सुभेदारास विलक्षण आनंद झाला. त्याला असें वाटलें कीं, आपण एकदम शिवाजीस दिल्लीस नेऊन बादशहापुढें उभें केलें तर तो आपल्यावर खूष होऊन आपणास एखादा प्रांत

बक्षीस देईल. शिवाजीस त्यानें दिल्लीस पाहिलें होतें, सबब त्यास ओळखण्याची त्याला अडचण नव्हती. आतां ब्राह्मणास बक्षीस देण्याचें तें बादशहाकडून द्यावयाचें, परंतु तें दिल्याखेरीज शिवाजीस पकडलें तर ब्राह्मण गवगवा करील, व शिवाजीस गुप्तपणें दिल्लीस नेण्याचा आपला हेतु साधणार नाहीं, असें त्यास वाटून त्यानें पदरचेच दोन हजार होन घेतले व दहाबारा निवडक लोकांसह तो ब्राह्मणाचे घरीं आला. शिवाजीस त्यानें तत्काळ ओळखलें, आणि ब्राह्मणाचे पुढें होनांची थैली टाकून शिवाजीस पकडून घेऊन तो चालता झाला. तें पाहून ब्राह्मणाच्या मनाची फार कष्टमय स्थिति झाली! गोसाव्यानें चिट्ठी दिली काय, आपण सुभेदाराकडे गेलों काय व तो आपल्यापुढें थैली टाकून गोसाव्यास पकडून घेऊन गेला काय, हा सर्व प्रकार त्यास कांहींच न समजल्यामुळें तो अगदीं घाबरून गोंधळून गेला. कांहीं केल्या त्याच्या जिवास चैन पडेना. त्यानें आपल्यापुढील थैली लाथेनें बाजूस ढकलली, आणि आपल्या आसऱ्यास राहिलेल्या पाहुण्यास पकडून नेण्याचे कामीं न समजतां तरी आपण कारण झालों असें म्हणून तो अत्यंत शोकाकुल झाला. याप्रमाणें दुःख करीत असतां त्यानें एकाएकीं तानाजीस आपणाकडे येतांना पाहिलें. गोसाव्याच्या काशीस गेलेल्या तिघां भावांपैकीं हा एक असें त्यानें तत्काळ ओळखलें. तेव्हां आतां याला याच्या भावाबद्दल काय सांगूं, असें वाटून ब्राह्मणास जास्तच दुःख झालें. शिवाजीस सुभेदारानें पकडून नेलेलें तानाजीनें पाहिलेंच होतें. कारण तो अहोरात्र ब्राह्मणाच्या घराच्या आसपासच कोठें तरी असे.

आपल्या डोळ्यांदेखत आपल्या प्राणाहून प्रिय स्वामीस नेतांना पाहतांच तानाजीच्या मनाची जी स्थिति झाली, तिचें वर्णन करणें अशक्य आहे. शेवटीं काय होईल तें होवो, जेथें शिवाजी तेथें आपण असा विचार करून, त्याजवर कांहीं प्रसंग आला असतां आपला जीव खर्ची पडेपर्यंत त्याचा बचाव करण्याचा यत्न करावयाचा, असा त्यानें निश्चय केला. मग तो कांहीं वेळ सुभेदाराच्या मागून चालला. पुढें सुभेदार शिवाजीसह आपल्या वाड्यांत शिरला, तेव्हां तानाजीही त्याच्या मागून जाऊं लागला. पण त्याला आंत कोणी सोडीना. तेव्हां निराश होऊन तो वेड्यासारखा इकडे तिकडे हिंडूं लागला. इतक्यांत त्याच्या मनांत असें आलें कीं, हा सर्व प्रकार कसा झाला हें तरी ब्राह्मणाकडून समजून घ्यावें. म्हणून वर सांगितल्याप्रमाणें ब्राह्मण दुःख करीत असतां तो त्याच्याजवळ गेला. ब्राह्मण शोकानें विव्हळ झालेला पाहतांच तानाजीस अधिकच दुःख झालें. तथापि तें सर्व दुःख गिळवेल तितकें गिळून तो ब्राह्मणाजवळ जाऊन बसला, आणि त्याचें सांत्वन करून म्हणाला: " महाराज, आतां व्यर्थ शोक करून उपयोग काय ? या आमच्या भावास पकडून नेण्याचें कारण काय, हें मला माहीत आहे. पण आधीं आपल्या घरीं काय काय प्रकार घडला तो मला सविस्तर सांगा. " त्यावरून शिवाजीनें पत्र दिल्यापासून शेवटपर्यंत सर्व हकीगत ब्राह्मणानें तानाजीस सांगितली. ती ऐकून तानाजीनें विचारिलें, " हा आमचा भाऊ अलीकडे अगदीं दुःखी असे कीं काय? किंवा आपण त्याच्यासाठीं काल परवां नेहमींपेक्षां जास्त कष्ट घेतले कीं काय? जें काय असेल तें संकोच न

करतां सर्व सांगा." ब्राह्मणानें आपणांस पडलेला उपास त्या गोसाव्याच्या नजरेला आला असावा, असें सांगितलें. हें ऐकतांच जसा एखादा मनुष्य अंधारांतून उजेडांत यावा तशी तानाजीची स्थिति झाली. शिवाजीचा स्वभाव त्याला पूर्णपणें माहीत असल्यामुळें, ब्राह्मणाचे उपकार फेडण्याकरितां त्यानें आपणास या संकटांत खचित घातलें असावें, असें त्याच्या पूर्णपणें ध्यानांत आलें; व प्रेम, पूज्यबुद्धि आणि शोक हे विकार एकवटून ते त्याच्या नेत्रांतून अश्रुधारांच्या रूपानें वाहूं लागले. नंतर आपण खरे कोण हें ब्राह्मणास सांगून त्याच्या साह्यानें शिवाजीच्या सुटकेच्या यत्नास लागावें असा त्यानें विचार केला. कांहीं दिवसांच्या निकट सहवासामुळें ब्राह्मणाच्या मनाचा थोरपणा त्यास पक्का कळून आला होता, यामुळें याला आपली गुप्त गोष्ट सांगितली असतां ती बाहेर फुटेल ही भीति त्याला मुळींच नव्हती. मग मनांत आल्याप्रमाणें जेव्हां त्यानें आपण कोण, कुठले ही हकीगत इत्थंभूत ब्राह्मणास कळविली, तेव्हां त्यास मोठा विस्मय वाटला.

नंतर आतां पुढें काय करावयाचें याबद्दल तानाजीचें व त्याचें कांहीं वेळ बोलणें झाल्यावर, तानाजी सुभेदाराकडील बातमी काढण्याकरितां त्याच्या वाड्याकडे गेला, आणि आज रात्रीं बारा वाजतां वीस लोकांनिशीं पकडून आणलेल्या मनुष्यास बरोबर घेऊन सुभेदारसाहेब दिल्लीस जाण्याकरितां निघणार, ही गुप्त बातमी तेथें त्यानें मोठ्या चातुर्यानें मिळविली. ही बातमी समजतांच तो परत ब्राह्मणाकडे आला. पुढें दोघांचें बराच वेळ बोलणें होऊन शेवटीं असें ठरलें

कीं, सुभेदारानें दिलेल्या थैलीपैकीं लागेल तेवढा भाग खर्च करून पन्नास हत्यारबंद जवान तयार करावे, आणि त्यांसह तानाजीनें, ज्या झाडींत शिवाजीचा व वाघाचा सामाना झाला, तेथें ताबडतोब जाऊन दडून बसावें. तयारी होतांच तानाजी पठाणाचा पोषाक करून व ते पन्नास असामी बरोबर घेऊन चार तास रात्रीच्या सुमारास त्या झाडींत जाऊन बसला.

मध्यरात्र उलटून गेल्यावर सुभेदाराची स्वारी वीस शिपायांनिशीं शिवाजीसह त्या झाडींत येऊन पोहोंचली. त्याबरोबर तानाजीच्या लोकांनीं एकदम मोठी आरोळी ठोकून त्या लोकांवर हल्ला केला. सुभेदाराजवळ तानाजीच्यापेक्षां लोक कमी होते; यामुळें या छाप्याचा शेवट काय झाला असावा हें वाचकांच्या ध्यानांत सहजच येईल. थोड्याच वेळांत तानाजीच्या लोकांनीं सुभेदार व त्याजबरोबरचे शिपाई या सर्वांस कापून काढलें, आणि तानाजीच्या इच्छेवरून त्यारा व शिवाजीस तेथेंच सोडून ते परत शहरांत निघून गेले.

मग शिवाजीनें तानाजीस, हा सर्व प्रकार कसा घडला याबद्दलची हकीगत विचारली. ती त्यानें सांगितल्यावर, तानाजी व येसाजी यांचें आपल्या ठायीं असणारें निस्सीम प्रेम, आणि त्या ब्राह्मणाची लोकोत्तर थोरवी, हीं पाहून त्याला पराकाष्ठेचा गहिंवर आला. नंतर सुमारें महिन्या दीडमहिन्यानें शिवाजी, तानाजी, येसाजी व संभाजी असे बरोबरच दाक्षिणेंत सुखरूप येऊन पोहोंचले. पुढें शिवाजीनें मोठमोठे पराक्रम करून मराठी राज्य कसें पूर्ण उदयास आणिलें ही हकीगत इतिहासप्रसिद्धच आहे.

## १०. शाळा

( १ )

जेथें एक दोन धडा पाठ केला—वंदून गुरूला आवडीनें
संवगड्यासंगें एकत्र जन्मलों—नाचलों खेळलों आनंदानें
वाजतांची घाट धावती चरण—आईचें स्मरण मनीं होई
ती ही शाळा छान, आनंदाचें स्थान—गेलें बालपण कैसें येई ?

( २ )

स्वजनीं म्हणावें 'बाळ बुद्धिमंत'—हाव ही मनांत हुषारीची
गुरूनें ' शाबास ' म्हणावें ही आस—लागावी जिवास आवडीची
अभ्यासावांचून काळजी न कांहीं—सुखाच्याच डोहीं मन पोहे
तेव्हां बहु वाटे होऊं केव्हां मोठे—परी आतां वाटे सान व्हावें

( ३ )

जगीं जे विद्वान होऊनिया गेले—शाळेचीं तीं बाळें आरंभींचीं
ज्ञानाच्या सुधेची पहिलीच वाटी—येथें त्यांच्या ओठीं लागली हो!
आजही महात्मे कीर्ति ज्यांची मोठी—इथें त्यांनीं पाटी उजळीली !
धन्य शालागेह धन्य ते विद्यार्थी—ज्यांनीं जगीं कीर्ति विस्तरीली

## ११. मलिकअंबर

महाराष्ट्रामध्यें मुसलमानी अमदानीमध्यें जे शहाणे, पराक्रमी, राजकार्यकुशल व प्रजाहितेच्छु असे थोर पुरुष होऊन गेले त्यामध्यें निजामशाहींतील सुप्रसिद्ध मुत्सद्दी मलिकअंबर ह्याची गणना आहे. मलिकअंबर हा जातीचा सिद्दी अथवा हबशी गुलाम होता. हा एका थोर फकीराच्या आशीर्वादानें महापदास चढला. हा पहिल्या

मूर्तिजा निजामशाहाचा स्वामिनिष्ठ प्रधान चंगीजखान याच्या पदरीं होता. त्याच्या हाताखालीं तो राज्यकारभाराचीं व मुलकी हिशेबाचीं कामें शिकला. अहमदनगरच्या निजामशाही राज्यामध्यें सोळाव्या शतकाच्या अखेरीस अगदीं निर्जीवता उत्पन्न होऊन तें राज्य मोंगल सैन्यानें इ. स. १६०० मध्यें जिंकून घेतलें. निजामशाहीची गादी संरक्षण करण्याकरितां चांदबिबीनें शेवटचा यत्न केला आणि तत्प्रीत्यर्थ आपला देह रणभूमीस अर्पण केला. तिच्या पश्चात् निजामशाहीची पुनः प्राणप्रतिष्ठा करून तिला सजीव करणारा कर्तृत्ववान् मुत्सद्दी मलिकअंबर हाच होय. हा चांदबिबीचा विश्वासू सेवक असून जुन्या निजामशाही घराण्याचा कट्टा अभिमानी व पुरस्कर्ता होता. अहमदनगर मोंगलांनीं जिकून घेतल्यानंतर त्यानें आपला स्वतंत्र पक्ष निर्माण करून मूर्तिजा निजामशाहा नांवाचा एक बादशहा सिंहासनारूढ केला व खडकी येथें नवीन राजधानी करून निजामशाहीचा स्वतंत्रपणें राज्यकारभार चालविला.

अहमदनगर येथें मोंगलांचा झेंडा फडकूं लागल्यानंतर अकबर बादशहानें खाजा बेग मिर्झा सफावी व मिर्झा महमद साली ह्या दोन सरदारांस जिंकलेल्या प्रांताचा कारभार सांगितला. त्यांनीं अहमदनगरच्या लोकांस संतुष्ट करून बादशाही राजसत्ता प्रस्थापित करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, परंतु त्यांत त्यांना चांगलेंसें यश आलें नाहीं. मलिकअंबर यानें आदिलशाही व कुतूबशाही राज्यांच्या सरहद्दीपर्यंत व अहमदनगरपासून आठ मैल अलीकडे व उत्तरेस चेऊल बंदरापर्यंत व दक्षिणेस दौलताबादेपर्यंत सर्व प्रांत आपल्या सत्तेखालीं घेतला.

इ. स. १६०५ मध्यें अकबर बादशाहा मृत्यु पावला व त्याचा पुत्र जहांगीर हा दिल्लीच्या बादशाहीचा अधिपति झाला. त्यानें आपले सरदार दक्षिणेंत पाठवून मलिकअंबर याची सत्ता संपुष्टांत आणण्याचा एकसारखा प्रयत्न केला; परंतु मलिकअंबराच्या शौर्या-पुढें व शहाणपणापुढें त्याचें कांहीं चाललें नाहीं.

मलिकअंबर यास मुख्यत्वेंकरून दिल्लीचे मोंगल हे मुख्य शत्रु असून त्यांनीं निजामशाही प्रांत जिंकून घेण्यासाठीं एकसारखा प्रयत्न व कारस्थानें चालविलीं होतीं. तथापि, मलिकअंबर यानें निजामशाहींतील मराठे सरदार अनुकूल करून घेऊन आपलें लढाऊ सैन्य नेहमीं तयार ठेविल्यामुळें मोंगलांची सरशी फारशी झाली नाहीं. मलिकअंबराच्या कारकीर्दींत सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे नवीन मराठे सरदारांचा उदय ही होय मालोजी व शहाजी हे पितापुत्र मलिकअंबराच्या प्रोत्साहनानें व सहानुभूतीनें महाराष्ट्र रंगभूमीवर प्रसिद्धीस आले. मलिकअंबरानें निजामशाहीस जें पुनः महत्त्व आणिलें त्याचा पुष्कळसा यशोभाग या मराठे सरदारांस देण्यास हरकत नाहीं.

मलिकअंबर हा मोठा शूर व पराक्रमी योद्धा होता हें त्यानें केलेल्या अनेक लढायांवरून व्यक्त होतें. महत्त्वाकांक्षी मोंगल, स्वार्थपटु आदिलशाही व बरीदशाही सरदार, आणि खुद्द घरचे निजामशाहींतील प्रतिस्पर्धी उमराव या सर्वांशीं त्यानें टक्कर देऊन निजामशाहीचें पुनरुज्जीवन केलें, यांतच त्याची कर्तृत्वशक्ति चांगली दिसून येते. तो जसा रणपटु योद्धा होता तसाच राजकारणपटु मुत्सद्दी

होता. त्याची खरी योग्यता त्यानें आपल्या राज्यामध्यें वसुलाच्या बाबतींत केलेल्या सुधारणेवरून कळून येते. अकबर बादशाहाच्या कारकीर्दींत राजा तोडरमल यानें जी जमीनमहसुलामध्यें सुधारणा केली तिचेंच अंशतः अनुकरण मलिकअंबरनें केलें. जमिनींची पहाणी करून त्यांची प्रतवारी ठरविली व जमिनींच्या उत्पन्नाच्या मानानें दोनपंचमांश हिस्सा धान्यरूपानें सरकारांत वसूल घेण्याचें ठरविलें. त्याचप्रमाणें प्राचीन ग्रामसंस्थांचें पुनरुज्जीवन केलें. पाटील कुलकर्णी यांचीं व इतर ग्रामाधिकाऱ्यांचीं वतनें वंशपरंपरेचीं केलीं. तोडरमलाप्रमाणें मलिकअंबरानें कायमची धारेबंदी मात्र केली नाहीं.

मलिकअंबर याची कारकीर्द विशेष यशस्वी होण्याचें कारण त्याची न्यायबुद्धि, सर्व जातींविषयीं समता, परमधर्मांविषयीं सहिष्णुता आणि प्रजेविषयीं प्रेमभाव हेच मुख्य गुण होत. त्यानें हिंदु-मुसलमानांविषयीं केव्हांहि भेदबुद्धि मनांत आणिली नाहीं. हिंदूंच्या देवस्थानांचें त्यानें रक्षण केलें व त्यांचीं उत्पन्नें चालविलीं, चिंचवडच्या मोरया देवास त्यानें नवीन इनाम करून दिलें. त्याचप्रमाणें त्यानें ब्राह्मण, मराठे वगैरे कुशाग्रबुद्धीच्या लोकांस उत्तेजन दिलें आणि त्यांच्या कर्तबगारीप्रमाणें त्यांना राज्यकारभारांत मोठमोठ्या जागा दिल्या. तेणेंकरून मलिकअंबराची कारकीर्द महाराष्ट्रांत फार लोकप्रिय झाली व त्याचें नांव दक्षिणेंतील उत्तम राज्यकर्त्या मुत्सद्यांमध्यें चिरकाल दाखल झालें.

मलिकअंबर इ. स. १६२६ मध्यें दौलताबाद येथें मृत्यु पावला, त्यावेळीं त्याच्या वयास ८० वर्षें होऊन गेलीं होतीं.

## १२. फुलपांखरूं

फूलपांखरूं मजा करी ।
    येऊनि आमच्या बागेंत ॥
नाचे, खेळे, भान हरी ।
    फिरतें हिरव्या गवतांत ॥
गुलाब, जाई, शेवंती—
    सर्व तयाला ये म्हणती ॥
फूलपांखरूं जरि जाई ।
    गंधाचा तें धनि होई ॥ १ ॥
चिमणें बालक मजा करी ।
    येवोनी ह्या जगतांत ॥
नाचे, खेळे, भान हरी ।
    फिरतें तें स्वच्छंदांत ॥
शील, नम्रता, सद्रीती—
    सद्गुण त्याला ये म्हणती ॥
चिमणें बालक जरि जाई ।
    कीर्तीचा तो धनि होई ॥ २ ॥

## १३. हिऱ्यांच्या दरींतील रात्र

पहिल्या सफरीहून परत आल्यावर कांहीं दिवस मीं चैनींत घालविले, पण मला लवकरच त्या चैनीचा कंटाळा आला व परदेश पहावा अशी उत्कंठा उत्पन्न झाली. थोड्याच दिवसांत पुन्हा माल खरेदी करून एका चांगल्या गलबतावर तो चढविला व आम्ही प्रवासास निघालों. नेहमींप्रमाणें वाटेंत ठिकठिकाणीं उतरून देवघेव

करीत आमचा प्रवास चालला असतांना एक दिवस आम्हीं एक बेट पाहिलें. तें फळझाडें व फुलझाडें यांनीं भरलेलें होतें, पण मौज ही कीं, तेथें वस्ती बिलकुल नव्हती. तेथें घर अगर झोंपडी तर नव्हतीच, पण कधीं मनुष्याची चाहूल असल्याचें चिन्ह ही नव्हतें. परंतु वनश्रीनें मोहून जाऊन आम्हीं थोडा वेळ तेथें घालविण्याचें ठरविलें. जरासा इकडे तिकडे फिरल्यावर मीं फलाहार केला व पाणी पिऊन विश्रांतीसाठीं किंचित् आडवा झालों, तों झोंप लागली. मी किती वेळानें जागा झालों कोण जाणे, पण त्यावेळेस जहाज चालूं लागलें होतें. मीं लगबगीनें किनाऱ्यावर जाऊन हांका मारल्या, पण फुकट.

अशा तऱ्हेनें त्या ओसाड बेटावर एकटा सांपडल्यावर माझ्या मनाची काय दशा झाली असेल बरें? जलपर्यटनाच्या नादीं लागून मीं सुखाचा जीव दुःखांत घातला म्हणून स्वतःला कितीतरी दोष दिला. पण नुसता विलाप करून काय फायदा होता? आलेल्या संकटांतून मार्ग कसा काढावा ह्याचा विचार करणें मला भाग होतें. सबब कोणत्या दिशेस जावें हें ठरविण्यासाठीं मीं एका उंच झाडावर चढून चोहोंकडे दृष्टि फेंकली तेव्हां असें दिसून आलें कीं, तो टापू कित्येक मैलपर्यंत अगदीं निर्जन होता. पण कांहीं अंतरावर मला एक पांढरा पदार्थ दिसला व तिकडे जाण्याचें मीं ठरविलें. तें काय असावें ह्यांची मला बिलकुल कल्पना नव्हती. पण जवळ गेल्यावर असें दिसून आलें कीं, हा एक पांढरा गोळा आहे. त्याचा घेर अदमासें दहा वांवा असावा.

हा गोळा असावा तरी काय, असा विचार करीत मी उभा असतांना एकाएकीं ढग आल्यासारखी काळोखी आली म्हणून वर

पाहिलें तों एक प्रचंड पक्षी आपणाकडे येत आहे असें दिसलें. रॉक म्हणून मोठे प्रचंड पक्षी असतात असें वर्णन मीं ऐकिलें होतें. तो हाच असावा व तो पांढरा पदार्थ म्हणजे त्या पक्ष्याचें अंडें असावें ही कल्पना मीं तावडतोब केली. ज्याप्रमाणें कोंबडी अंड्यांना ऊब देण्यासाठीं त्यांवर बसते, त्याचप्रमाणें आपल्या अंड्याला ऊब आणण्यासाठीं रॉक पक्ष्याची मादी येत होती व ती लवकरच त्या अंड्यावर बसली. मी अंड्याच्या अगदीं जवळच उभा असल्यामुळें त्या पक्ष्याच्या पायाचें एक बोट माझ्या शरिराला चिकटलें. बोट कसचें, झाडाचें खोडच तें ! विचारांत फारसा वेळ न घालवितां मी डोक्याचें पागोटें काढून त्यानें माझें शरीर त्या पक्ष्याच्या बोटास बांधून टाकलें. माझ्या ह्या धाडसाचें आज मला फार आश्चर्य वाटतें; पण जवळचें दृश्य संकट टाळण्यासाठीं मनुष्य अदृश्य संकट कसें पत्करतो याचें हें उदाहरण आहे. त्या ओसाड प्रदेशांतून सुटका होण्यासाठीं मीं रॉक पक्ष्याबरोबर गगनाचा प्रवास पत्करला.

माझी कल्पना लवकरच खरी ठरली. दुसरे दिवशीं तो पक्षी माझ्यासकट उडाला व थोडा वेळ इकडे तिकडे फिरून एके ठिकाणीं जमिनीवर टेंकला. ह्या गगनविहारानें मला भोवंड आली होती तरी जमिनीचा स्पर्श होतांच मी पागोट्याची गांठ सोडून मोकळा झालों. थोड्या वेळानें त्या पक्षानें एका सापावर झडप घातली व त्याला चोंचींत धरून आकाशांत पुनरुड्डाण केलें.

थोड्या वेळानें भानावर येऊन मीं इकडे तिकडे पाहिलें तों काय ? मी वैलांतून निघून चुलाण्यांत पडलेला. अगोदर मी सपाट बेटावर तरी होतों

पण आतां एका खोल दरींत सांपडलों. दोनही बाजूंस कडा इतका अवघड कीं, तो चढून जाणें अशक्य. तेव्हां दरींतच इकडे तिकडे हिंडून मार्ग काढावा म्हणून वळलों तों तेथें दरीच्या तळाशीं हिरे पसरलेले! हे हिरे कसे आहेत म्हणून पाहूं लागलों तों पलीकडे काय—अबब! केवढाले तरी अजगर त्या दरींत! मी मट्कन् खालीं बसलों. हिरे पाहून झालेला आनंद मावळला व ह्या दरींतच आपण सर्पमुखीं पडणार ही खात्री झाली. तेव्हां दिवस होता. त्यामुळें हे अगतर रॉक पक्ष्याचे भयानें लपून बसत व म्हणून दिवसभर मला फिरतां आलें. त्या दिवशीं मीं कितीतरी हिरे पायाखालीं तुडविले असतील, पण एकही उचलून खिशांत टाकण्याची इच्छा मला नव्हती. संध्याकाळीं एक लहानसें भगदाड पाहून त्यांत मी बसलों व अजगरांना प्रतिबंध करण्यासाठीं तोंडावर एक भला मोठा धोंडा ठेवला. ती काळरात्र मला अजून आठवते तेव्हां माझा थरकांप होतो. ती दरी अजगरांच्या फूत्कारांनीं दुमदुमून गेली होती. अशा स्थितींत मला झोंप आली नाहीं यांत नवल काय?

सूर्योदय झाल्यावर अजगर आपल्या लपण्याच्या जागीं गेले व मी बाहेर पडलों. थोडा वेळ इकडे तिकडे हिंडतों तों कांहीं तरी धप्कन् पडल्याचा आवाज झाला व एकामागून एक असे मांसाचे बरेच मोठे मोठे तुकडे दरींत पडले. ह्या भूतलावर एक हिऱ्याची खोल दरी आहे व व्यापारी लोक तींतून मोठ्या हिकमतीनें हिरे मिळवितात ही गोष्ट मीं ऐकली होती, पण ती मला खरी वाटत नसे. आतां ती पटली. ह्या मांसाच्या तुकड्यांना कांहीं हिरे चिकटत व त्या दरींत हिंडणारीं गिधाडें ते तुकडे उचलून, खाण्यासाठीं

वर आणीत. तीं वर आलीं म्हणजे गलबला करून त्यांना पळवून लावावयाचें व हिरे आपण घ्यावयाचे अशी ती युक्ति होती.

ही हकीकत मला आतां आठवली व सुटकेची आशाही दिसूं लागली. मग मीं बरेच मोठमोठे हिरे वेंचून कशांत भरले व कसा कंबरेला बांधला. तसेंच खिशांतही बरेच वेंचक हिरे कोंबले. नंतर मांसाचा एक भला मोठा तुकडा पागोट्यानें पाठीस बांधला व दरींत पालथा पडून राहिलों. थोड्याच वेळांत त्या दरींत गिधाडें हिंडूं लागलीं व एकेकानें एक एक मांसाचा तुकडा उचलला. त्यात एकानें मलाही उचललें व वर डोंगरावर नेलें. तेथें व्यापारी होतेच, त्यांनीं आरोळ्या मारतांच गिधाडें पळून गेलीं व मी उठून बसलों. मला पाहून त्या व्यापाऱ्यांना आश्चर्य वाटलें व हा कोण भागीदार आला असें वाटून रागही आला. पण मीं आपली हकीकत सांगितली व त्यांना माझ्या जवळचे कांहीं हिरेही देऊं केले, तेव्हां त्यांचा राग मावळला व मला घेऊन ते आपल्या रहाण्याच्या ठिकाणीं परतले.

घरीं आल्यावर त्या व्यापाऱ्यांनीं पुन्हां एकदां माझी हकीकत सविस्तर ऐकली तेव्हां त्यांना माझ्या धाडसाचा विस्मय वाटला. नंतर ज्या व्यापाऱ्याचा मांसाचा तुकडा मीं उचलला होता त्याला मीं कांहीं हिरे देऊं केले, पण तो घेईना. केवळ आग्रहास्तव एक लहानसा हिरा मात्र त्यानें घेतला. तो म्हणाला: "ज्या परमेश्वरानें तुम्हांवर संकटें आणलीं त्यानेंच तुमच्या धाडसाबद्दल तुम्हांस बक्षीस दिलें आहे; त्यांत वांटेकरी होण्याचा मला हक्क नाहीं."

आतां व्यापाऱ्यांचें काम आटोपलें होतें म्हणून आम्ही सर्व-

जण परतलों. वाटेनें पुष्कळ चमत्कारिक गोष्टी मीं पाहिल्या. गेंडा हें जनावर ह्याच प्रदेशांत पहावयास मिळतें. तें हत्तीपेक्षां लहान असून त्याला नाकावर एक लहानसें शिंग असतें. असें म्हणतात कीं, गेंडा हत्तीबरोबर लढाई करतो तेव्हां तो आपलें हें शिंग हत्तीच्या पोटांत खुपसतो. वाटेंत निरनिराळीं बंदरें लागलीं. तेथें आम्हीं बराच व्यापार केला व सरतेशेवटीं बसऱ्याहून बगदादला पोहोंचलों. ह्या सफरींत मला अनन्वित नफा झाला व मीं धर्मही बहुत केला. तसेंच ह्या सफरींतील संकटांची आठवणही मला फार दिवस राहिली व म्हणून बरेच दिवस पुन्हां सफरीवर जाण्याची इच्छा मला झाली नाहीं.

## १४. स्फुट अभंग

१

नीचपण बरवें देवा । न चले कोणाचाही दावा ॥ १ ॥
महापुरें झाडें जाती । तेथें लव्हाळे राहती ॥ २ ॥
येतां सिंधूच्या लहरी । नम्र होतां जाती वरी ॥ ३ ॥
तुका म्हणे हेंचि फळ । पाय धरिल्या न चले बळ ॥ ४ ॥

२

जे कां रंजले गांजले । त्यांसि म्हणे जो आपुले ॥ १ ॥
तोची साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा ॥ २ ॥
मृदु सबाह्य नवनीत । तैसें सज्जनाचें चित्त ॥ ३ ॥
ज्यासि आपंगिता नाहीं । त्यासि धरी जो हृदयीं ॥ ४ ॥
दया करणें जे पुत्रासी । तेचि दासा आणि दासी ॥ ५ ॥
तुका म्हणे सांगूं किती । तोचि भगवंताची मूर्ति ॥ ६ ॥

३

घेईं माझे वाचे । गोड नाम विठोबाचें ॥ १ ॥
डोळे तुम्ही घ्यारे सुख । पहा विठोबाचें मुख ॥ २ ॥
तुम्ही आइका रे कान । माझ्या विठोबाचे गुण ॥ ३ ॥
मना तेथें धांव घेईं । राहें विठोबाचे पायीं ॥ ४ ॥
तुका म्हणे जीवा । नको सोडूं या केशवा ॥ ५ ॥

४

कांरे नाठवीसी कृपाळु देवासी । पोसीतो जनासी एकलाची ॥१॥
फुटे तरुवर उष्णकाळमासीं । जीवन तयासी कोण घाली ॥२॥
बाळा दुग्धा कोण करितें उत्पत्ती । वाढवी श्रीपती सवें दोन्ही ॥३॥
तेणें तुझी काय नाहीं केली चिंता । राहें त्या अनंता आठवूनि ॥४॥
तुका म्हणे ज्याचें नांव विश्वंभर । करीं निरंतर ध्यान त्याचें ॥५॥

५

बोले तैसा चाले । त्याचीं वंदीन पाऊलें ॥ १ ॥
अंगें झाडीन अंगण । त्याचें दासत्व करीन ॥ २ ॥
त्याचा होईन किंकर । उभा ठाकेन जोडोनि कर ॥ ३ ॥
तुका म्हणे देव । त्याचे चरणीं माझा भाव ॥ ४ ॥

६

खरें बोले तरी । फुकासाठीं जोडे हरी ॥ १ ॥
ऐसे फुकाचे उपाय । सांडुनिया वायां जाय ॥ २ ॥
परउपकार । एका वचनाचा फार ॥ ३ ॥
तुका म्हणे मळ । मनें सांडितां शीतळ ॥ ४ ॥

७

भाव धरी तया तारील पाषाण । दुर्जना सज्जन काय करी ॥ १ ॥
करितां नव्हे नीट श्वानाचें हें पुच्छ । खापरा परीस काय करी ॥ २ ॥
काय करिल तया साखरेचें आळें । बीज तैसीं फळें येती तया ॥ ३ ॥
तुका म्हणे वज्र भंगे एक वेळ । कठीण हा खळ तयाहूनी ॥ ४ ॥

८

आतां तरी पुढें हाचि उपदेश । नका करूं नाश आयुष्याचा ॥ १ ॥
सकळांच्या पायां माझे दंडवत । आपुलालें चित्त शुद्ध करा ॥ २ ॥
हित तें करावें देवाचें चिंतन । करूनियां मन एकविध ॥ ३ ॥
तुका म्हणे लाभ होय तो व्यापार । करा काय फार शिकवावें ॥४॥

## १५. शाहू महाराजांचा कुत्रा

शाहू राजा सर्व राज्यकारभाराचें ओझें आपल्या प्रधान लोकांवर टाकून आपण निश्चिंत राहत असे. त्याला शिकारीचा नाद फार होता. त्याच्याबरोबर जी शिकारी मंडळी असे तींत शाहू राजाचा एक आवडता कुत्रा व रघोजी भोसला होता. हे दोघे त्याला सोडून दूर कधींहि राहत नसत. कसाही प्रसंग आला तरी हे दोघे राजाशीं लगटून असावयाचेच. यामुळें या दोघांवर त्याची फारच कृपा होती. एके दिवशीं शाहू शिकारीस गेला होता. तो रानावनांतून व डोंगर-खोऱ्यांतून शिकार करीत चालला असतां जवळच्या जाळींतून एक मोठा वाघ उड्डाण करून शाहूवर चाल करून आला. तें पाहून कुत्र्यानें त्याबद्दलची सूचना आपल्या धन्यास दिली, परंतु शाहूचें लक्ष तिकडे गेलें नाहीं. रघोजीनें तो वाघ पाहिला मात्र. तो वाघाच्या व

राजाच्या मध्यें झटकन् आला आणि त्यानें तो वाघ अंतराळींच मधल्यामध्यें आपल्या भाल्यानें हाणून खालीं पाडिला. वाघ पुनः उडून उडी मारणार, तों खालीं कुत्रा होता त्यानें त्यावर चाल केली. दोघांची मोठीच झटपट झाली. तींत कुत्र्यानें वाघास मारून, फाडून त्याचीं आंतडीं बाहेर काढलीं. हें पाहून राजानें त्यास जवळ बोलावून त्यास कुरवाळून त्याची पाठ थोपटली. राजा शिकार करून साताऱ्यास आला तेव्हां कुत्र्यास पालखींत घालून त्याची मोठ्या थाटानें मिरवणूक काढली; व रघोजी भोसला यास वऱ्हाड प्रांताची सुभेदारी दिली. पुढें तो कुत्रा मेला. तेव्हां शाहूनें त्याचा प्रेतसमारंभ मोठ्या थाटाचा करून, त्याचें प्रेत संगममाहुलीजवळ कृष्णातीरीं नेऊन पुरलें व त्यावर एक थडगें बांधून त्या थडग्यावर कुत्र्याची प्रतिमा करून बसविली. तें थडगें माहुलीजवळ अजून आहे.

## १६. दंवाचे थेंब

" कोठुनि हे आले येथें ? काल संध्याकाळीं नव्हते ! "
हिमकण पाहुनि ते वेलीं—वरि पडले आज सकाळीं,
आईला बाळ्या वदला, कुतुकानें उत्सुकलेला—
" दिसती हे गोजिरवाणे, मोत्यांचे जैसे दाणे !
आई ग ! तर वद मातें, कोठुनि हे आले येथें ?
सूर्याच्या ह्या किरणांत, कसे पहा चमकतात !
मौज मला भारी वाटे, होते हे तर वद कोठें ?"
चुंबुनिया त्या तनयातें, वर करुनी बोट वदे ते—
" चंद्र आणि नक्षत्रें तीं, शोभलीं जेथ बा रातीं,

उजेडही जेथुनि येतो, पाउसही जेथुनि पडतो,
तेथुनि हे आले येथें, तेथुनीच तूं आम्हांतें !"
" राहतील येथें कां ते ? मिळतिल कां खेळायातें ?
मज गम्मत वाटे, आई ! घेउनि दे मजला कांहीं !"
" नाहीं रे ! ते स्वकरांत, येणार गड्या नाहींत;
कौतुक कर बघुनी त्यांतें, असती ते जोंवरि येथें;
सूर्य त्यांस अपुल्या किरणीं, नेईलाचि लौकर गगनीं !"
" जातिल ते लौकर गगनीं " वदतां गहिंवरली जननी !
गत बाळें तिजला स्मरलीं, डोळ्यांत आंसवें आलीं !
" देवा रे ! "—मग ती स्फुंदे—"एवढा तरी लाभूं दे !"
म्हणुनि तिनें त्या बाळासी धरिलें दृढ निज हृदयाशीं !
पाहुनि त्या देखाव्याला, कळवळा कवीला आला
वेडावुनि तयाच नादें " खरेंच !"—तो पुसतो खेदें—
" होते हिमबिंदु सकाळीं, कोठें ते सायंकाळीं ?"

## १७. समर्थ रामदास

रामदासांचे वडील सूर्याजीपंत ठोसर. हे एक प्रतिष्ठित संभावित व सुखवस्तु गृहस्थ होते. त्यांना बारा गांवच्या कुळकर्णीपणाचें वतन होतें. ते औरंगाबाद जिल्ह्यांतील आंबडे पेट्यांतील जांब या गांवीं राहात असत. हें गांव गोदावरीच्या उत्तरतीराला आहे. सूर्याजीपंताच्या बायकोचें नांव राणूबाई असें होतें. या दांपत्याला बऱ्याच काळपर्यंत संतान नव्हतें. उतारवयांत गंगाधर व नारायण ( हेंच

रामदासांचें मूळ नांव ) नांवाचे दोन पुत्र झाले. गंगाधराचा जन्म सन १६०५ मध्यें झाला व नारायणाचा जन्म सन १६०८ मध्यें झाला. दोन्ही मुलांची मुंज त्यांच्या पांचवे वर्षी झाली. गंगाधराचें लग्न वयाच्या सातव्या वर्षी झालें व तो जांबगांवींच आपला संसार करून राहिला. तो रामभक्त होता व पुढें त्याचें श्रेष्ठ असें नांव पडलें. सन १६१५ मध्यें म्हणजे नारायणाचें वय सात वर्षांचें असतांना सूर्याजीपंत वारले. त्यामुळें नारायणाचें लग्न लांबलें असावें. नंतर थोडे दिवसांनीं नारायणाच्या आईनें त्याच्या लग्नाचा निश्चय ठरविला. पण नारायणाला तो पसंत नव्हता. आईनें मुलगी पाहून लग्नाची तयारी केली. व वधूवर बहुल्यावर उभीं असतां भटजींनीं मोठमोठ्यानें मंगलाष्टकें म्हणून शेवटीं ‘ शुभ मंगल सावधान ’ हे शब्द उच्चारले. हे शब्द ऐकल्याबरोबर नारायण लग्नमंडपांतून पळून गेला. येथपासून नारायणाच्या आयुष्यक्रमाला निराळी दिशा लागली. ही गोष्ट नारायण बारा वर्षांचा असतांना म्हणजे सन १६२० मध्यें घडली.

नारायण घर सोडून निघाला तो गोदावरीचें उगमस्थान व रामाच्या वनवासांतील निवासस्थान जें नाशिक-पंचवटी तेथें आला व नाशकाजवळ असलेल्या टाकळी गांवच्या गुहेंत राहूं लागला. तो ब्रह्मचारीच होता. तेव्हां त्या आश्रमाला अनुरूप अशी भिक्षावृत्ति ठेवून तो तपश्चर्या व पुरश्चरण करूं लागला. रामदासांच्या (आतां यापुढें त्याचा रामदास या नांवानें निर्देश करणें योग्य आहे) आध्यात्मिक ज्ञानाचा, त्यांच्या काव्यशक्तीचा व एकंदर भावी साधूपणाचा पाया येथें घातला गेला असला पाहिजे. रामदासांनीं येथें बारा वर्षें वास करून अध्यात्म-

ज्ञान मिळविलें. नंतर ते तीर्थाटनास निघाले व या तीर्थाटनांतहि त्यांनीं बारा वर्षें घालविलीं. या प्रवासांत त्यांना खरोखरीच पुष्कळ व्यावहारिक ज्ञान व अनुभव मिळाला असला पाहिजे. त्याचप्रमाणें निरनिराळ्या ठिकाणचे साधुसंत भेटून त्यांच्या आध्यात्मिक ज्ञानात भर पडली असली पाहिजे.

बारा वर्षें तपश्चर्या आणि बारा वर्षें तीर्थाटन केल्यानंतर १६४४ मध्यें समर्थ आईला व भावाला भेटण्यास जांब गांवीं आले. त्या वेळीं आपला विद्याभ्यास व तीर्थाटन पुरें करून रामदास आपल्या पुढल्या आयुष्यांतील कामाला लागण्यास तयार झाले होते. व या काळींच एखादा भक्तिपंथ काढून त्या द्वारें लोकशिक्षणाचें काम करावें असा त्यांनीं निश्चय केला. योग्य ठिकाण ठरविण्यांत त्यांचा कांहीं काल गेला असावा. कारण ते जांबांत कांहीं दिवस राहून पुनः घराबाहेर पडले. अखेरीस त्यांनीं चाफळ हें गांव पसंत करून तेथें रामाचें देऊळ बांधून रामोत्सव सुरूं करण्याचा निश्चय केला. १६४८ मध्यें राममंदिर बांधून उत्सव सुरूं झाला व त्यामुळें त्यांच्याभोंवतीं शिष्यसमुदाय जमूं लागला. तेव्हां रामदासांनीं दासपंथ काढून शिष्यसांप्रदायाला प्रारंभ केला.

याप्रमाणें रामदासांच्या पंथाचा व त्यांच्या शिष्यसांप्रदायाचा प्रसार होऊन रामदासांची कीर्ति शिवाजीच्या कानावर गेली व त्याला रामदासांच्या भेटीचा निदिध्यास लागला. शेवटीं शिवाजीची व रामदासांची भेट चाफळजवळील शिंगणवाडीच्या बागेंत झाली व तेथें रामदासांनीं शिवाजीला गुरुमंत्र देऊन त्यावर सन १६४९ मध्यें अनुग्रह केला असें वर्णन बखरींतून येतें. कित्येकांच्या मतें

शिवाजीची व रामदासांची प्रत्यक्ष भेट फार उशीरा म्हणजे १६७२ मध्यें झाली.

रामदासस्वामींच्या आयुष्यांतील शेवटलीं तीस बत्तीस वर्षें महाराष्ट्रांत लोकजागृति करण्यांत खर्च झालीं. हीं वर्षें त्यांनीं आपल्या पंथाचा पसार करण्यांत, त्या पंथाची शिष्यशाखा वाढविण्यांत, हरिकथाकीर्तनांत व दासबोधादि ग्रंथ लिहिण्यांत घालविलीं. रामदासांच्याबद्दल त्यांच्या शिष्यसमुदायांत विलक्षण आदरबुद्धि वसत होती व त्यांच्या या उद्योगामुळें व आयुष्यांतील इतर अलौकिक गोष्टींमुळें त्यांना लोक अवतार मानूं लागले होते. रामदासांची शिष्यशाखा फार मोठी होती; त्यांनीं जागोजाग आपल्या पंथाचे मठ स्थापन केले. तसेंच राम व मारुती यांचीं पुष्कळ देवळें त्यांनीं बांधलीं.

शिवाजीमहाराज सन १६८० सालीं रायगडावर मृत्यु पावले. ही वार्ता ऐकून रामदासस्वामींस अत्यंत दुःख झालें: तेव्हांपासून स्वामींनीं फारसें कोठें जाण्याचें सोडलें व अन्नही वर्जिलें आणि ते निव्वळ दुधावर राहूं लागले. शिवाजी महाराजांच्या मरणानंतर संभाजीराजे राज्यावर बसले. त्यांनीं चालविलेलीं अनान्वित कृत्यें ऐकून संभाजी महाराजांस उपदेशपर एक पत्र रामदासांनीं लिहिलें व आपल्या शिष्याबरोबर तें त्यांजकडे पाठवून दिलें. त्यावरून रामदासांची शिवाजीबद्दल केवढी आदरबुद्धि होती हें व्यक्त होतें. यानंतर रामदास फार दिवस जगले नाहींत. त्यांचें देहावसान सन १६८१ सालीं माघ वद्य नवमी रोजीं झालें.

## १८. नामलेखन

हिंडतां सहज सागरतीरीं । लाधली मजसि शिंप रुपेरी ॥
तीस घेउनि करीं लिहिलें मीं । आत्मनाम सिकतेवर नामी ॥ १ ॥
राहिलों मग ज़रा जलधीची । कांति देखत मनोहर साची ॥
लाट एक इतुक्यांत निघाली । अक्षरें धुवुनि ने लिहिलेलीं ॥ २ ॥
अब्धिची अदय देखुनि लीला । जाहलें विपुल दुःख मनाला ॥
दूषिलें कटुवचें बहु त्याला । मानसीं क्षण विवेक न केला ॥ ३ ॥
वीचि वारिधि पुन्हा वर फेंकी । योग्य बोध मजला करण्या कीं–॥
"दुःख सोड, मनुजा सकलांची । शेवटीं स्थिति अशी घडण्याची ॥४॥
कालसागर भयंकर फार । गर्जतो निशिदिनीं अनिवार ॥
फेंकुनी अपुलिया लहरीतें । जें दिसे त्वरित सर्व हरी तें ॥ ५ ॥
नांव गांव तव सद्म शरीर । सर्व जाइल लयास अखेर ॥
जें असें उघड नश्वर त्याचा । मानसीं वद विषाद कशाचा ?"॥६॥
दिव्य बोध किति हा जलधीचा । घेउनी समजुनी मनिं साचा ।
जो जगांत निज वर्तन ठेवी । दुःख त्यास कुठुनी भय दावी ?॥७॥

## १९. आराम

आश्रमाच्या सभोंवतीं लाविलेल्या 'वृक्षकां'ना तपस्व्यांच्या मुली पाणी घालीत असून गृहस्थाश्रमाला सुरवात होण्यापूर्वींच 'अपत्य-स्नेहाचा' अनुभव घेत आहेत, ही कल्पना कविश्रेष्ठ कालिदासाच्या विशेष आवडीची असावी असें त्याच्या ग्रंथांतील वर्णनांवरून वाटतें. खरेंच आहे ! वृक्षसंवर्धनापासून जो आनंद प्राप्त होतो, तो बऱ्याच

अंशीं बालसंवर्धनापासून होणाऱ्या आनंदासारखा असतो. आपण लाविलेल्या झाडांना कोणीं दुखापत केली, त्यांचीं पानें किंवा फांद्या कोणीं तोडिल्या तर आपणांस वाईट वाटतें. त्यांना फुलें व फळें आलेलीं पाहून आपणांस धन्यता वाटते. त्या फुलांफळांपासून जें सुख होतें तें दुसऱ्याच्या चांगल्या व मोठ्या फुलांफळांपासूनही होत नाहीं. मातेचें जसें प्रेम आपल्या मुलांवर त्याचप्रमाणें झाडें लावणारांचें प्रेम स्वतः लाविलेल्या झाडांवर असतें.

वृक्षांच्या शीतल छायेंत, फळाफुलांच्या सान्निध्यांत, खगगणांच्या मधुर गीतांचा आस्वाद घेण्यांत, ज्यांचें बालपण गेलें असेल त्यांना शहरांतल्या घाणेरड्या, धुरकट, धूलीमय व रुक्ष वातावरणांत आयुष्याचे दिवस काढणें झाल्यास फारच मोठें संकट वाटतें. व शहरांत पैशामुळें लाभणाऱ्या सुखाचा वीट येऊन आपल्या बागेंत किंवा शेतांत कष्ट करून निसर्गाच्या संगतींत लाभणाऱ्या आरोग्ययुक्त सुखाकडे त्यांचें मन धांव घेतें. मुंबईपुण्यासारख्या शहरांत दिवस काढणाऱ्या लोकांचा असा अनुभव आहे कीं, वर्षांतून एकादा महिना खेड्यांतील बागेंत जाऊन राहिल्यास, त्यांचें आरोग्य वाढून मनही सुप्रसन्न होतें. दिवसाचे काबाडकष्ट संपल्यावर संध्याकाळीं तास अर्धातास एखाद्या बागेंत काढल्यासही शरीर व मन ह्यांना कितीतरी प्रसन्नता वाटते !

बागेंत आनंद वास करतो; बागेंत सुख नांदतें; बागेंत सौंदर्य वसतें; बागेंत जिकडे तिकडे शरिरास व मनास प्रफुल्लता देणारें जीवन आढळून येतें; म्हणून सुख व आरोग्य पाहिजे असेल त्यांनीं शक्य असल्यास, आपल्या घराभोंवतीं स्वतां झाडें लावून बाग तयार

करावी. मुलांकरितां पुष्कळ श्रम करूनही मातेला जसा शीण वाटत नाहीं, त्याप्रमाणेंच बागेंत फळांफुलांच्या सान्निध्यांत केलेले श्रम आपणांस कळून येत नाहींत.

बागेंतलें सात्विक सुख श्रीमंत व गरीब या उभयतांनाही मिळवितां येण्याजोगें आहे. किंबहुना श्रीमंतांपेक्षां गरिबांनाच तें अधिक लाभण्याचा संभव आहे. ज्याच्या ज्याच्या घराभोंवतीं मोकळी जागा व पाणी असेल, त्याला त्याला या स्वर्गीय सुखाचा आस्वाद घेता येईल. आज आपल्या देशांत आपण हिंडलों, तर किती तरी घरें अशी आढळून येतील कीं, सभोंवतीं जागा व पाणी असूनही शपथेला एक झाडही मिळावयाचें नाहीं. याचें कारण आपणांत सौंदर्यप्रीति व शुद्धसुखाचा आस्वाद घेण्याची अभिरुचि हीं बऱ्याच कमी प्रमाणांत आढळून येतात हें होय. वृक्ष हे मुलांप्रमाणें सुखदायक असतात असें वर म्हटलें, परंतु एका दृष्टीनें ते मुलांपेक्षांहि जास्त आल्हादकारक असतात. कारण मुलांमध्यें कित्येक मुलें कृतघ्न निघण्याचा संभव असतो. पण वृक्षात एकही वृक्ष तसा निघत नाहीं. आपण त्यांना वाढविलें कीं, ते फळांफुलांच्या रूपानें आमरण आपली व आपल्या पुढल्या पिढीची पण सेवा करीत रहातात

घराभोंवतीं उद्यानरचना करणें खर्चाचें नसून उलट फायदेशीर आहे. कित्येक घरांशेजारीं वापराचें पाणी मोकळें सोडलेलें असल्यामुळें तें कुजतें व रोग उत्पन्न करतें. हेंच पाणी जरा बाजूला काढून जर चार झाडें लाविलीं आणि घरांतील राख, शेण वगैरे पदार्थांचा खत म्हणून त्यांस उपयोग केला तर अमृतासारखीं गोड फळें आपणांस चाखावयास मिळणार नाहींत कां ?

उद्यानरचना हा एक असा व्यवसाय आहे कीं, त्यांत कुटुंबांतील सर्व माणसांना भाग घेता येतो. अगदीं लहान मुलापासून तों वृद्ध आजोबापर्यंत प्रत्येकाला आपापल्या शक्तीप्रमाणें बागेंत कांहींतरी काम करिता येतें. बागेमुळें रिकाम्या वेळेचा सदुपयोग होऊन शिवाय आरोग्य व आनंद यांचा लाभ होतो. मुलांना कित्येक वनस्पतींची सहज माहिती होऊन त्यांच्या ज्ञानांत भर पडते व लहानपणापासून शारीरिक श्रम करण्याची संवय होऊन आरोग्याची किल्ली त्यांच्या हातीं राहते.

वृक्षसंवर्धन हें उत्तम प्रकारचें शिक्षण आहे. त्यापासून शरीर निरोगी राहतें; मनांतील कोमलभाव व निरीक्षणशक्ति जागृत होतात. शाळेच्या सभोंवतीं मुलांकडून बाग तयार करवून घेतल्यास मुलांना ह्या तिन्ही गोष्टींचा लाभ होऊन शिवाय शाळेच्या मंदिराला अप्रतिम शोभा पण येते

या पृथ्वीवर बागा जितक्या वाढतील तितक्या प्रमाणानें येथील आरोग्य व निष्पापवृत्ति वाढेल, व त्या जितक्या कमी होतील तितक्या प्रमाणानें येथील भयाणता व दुःख दुणावेल. भगवान् श्रीकृष्णाचें बालपण निसर्गातल्या बागेंतच गेलें. बायबलांतील कथेंत परमेश्वरानें मनुष्यजातीच्या मूळ मातापित्याला सर्व प्रकारचें सुख प्राप्त व्हावें म्हणून ‘ एडन ’ नांवाच्या रम्योद्यानांत ठेविलें होतें; परंतु त्यांच्यांत पापवृत्तींचा अंकुर उद्भवतांच त्यांना शिक्षा म्हणून तेथून घालवून दिलें, असें जें वर्णन आहे त्यांत फार खोल अर्थ असावा असें वाटतें. मनाला आराम पाहिजे असेल, तर आपल्या घराभोंवतीं ‘ आराम ’ निर्माण करणें हा एक आपल्या स्वाधीनचा उपाय आहे.

## २०. बाललीला

विचारांनीं मी क्रष्टि होउनीया
नेत्र मिटले आडवे होउनीया
तोंच उघडोनी दार बाळ पाही
असें वाचित कीं काम करी कांहीं ॥

झोंप लागलि समजून हळुंच बाळें
टेबलाशीं खुर्चीस ओढियेलें
चढुनि कष्टें खुर्चींत मग बसून
पाहियेलें मेजास न्याहळून ॥

ग्रंथ दऊती पेन्सिली रबर टांक
वस्तु पडल्या टेबलावरि अनेक
कळी नाखुष जी सर्व करिं धरून
क्षणीं फुलली चष्म्यास विलोकून ॥

ठेवि चष्मा मग कसा बसा नाकीं
ग्रंथ इंग्रजि उलटाच धरी हातीं
रेलुनीया मेजास लावि पाय
' येस नो ' च्या वाचनीं दंग होय ॥

झणी आरशि दिसणार फोडलेली
म्हणुनि मन्मनिं चुळबूळ चाललेली
जरी अंतरिं घाबरा जीव झाला
हंसू लोटे मज बघुनि बाललीला ॥



अबूचा पहाड

## २१. अबूचा पहाड

मुंबई इलाख्याच्या उत्तरेस अगदीं टोंकावर शिरोही संस्थानांत अरवलीच्या पश्चिमेस सुमारें सात मैलांवर अरवलीच्या रांगांसमोर हा पर्वत आहे. याचा आकार लांब व चिंचोळा असून याची लांबी पायथ्याशीं २० मैल व घाटमाथ्यावर १४ मैल आहे व रुंदी २ मैल आहे. याची दिशा ईशान्य—नैऋत्य अशी आहे. हा पहाड फार प्राचीन असावा असें याच्या स्वरूपावरून दिसतें. या डोंगराचे दगड वर्तुलाकार असून गुळगुळीत झालेले आहेत. यावरून पुष्कळ काळपर्यंत वारा, पाऊस इत्यादि पंचमहाभूतांच्या परिणामानें त्यास ही स्थिति प्राप्त झाली असावी, असें भूगर्भशास्त्रवेत्त्यांचें मत आहे. या पहाडाची उंची समुद्रापासून घाटमाथ्यावर ४००० फूट आहे. व पायथ्यापासून ३००० फूट आहे. याचें सर्वांत उंच शिखर ५६४३ फूट असून त्यास गुरुशिखर असें म्हणतात. या पहाडावर झाडी फारशी नाहीं. हल्लीं शिरोही दरबारकडून ही झाडी वाढविण्याचे प्रयत्न सुरूं आहेत. याच्या पायथ्यापासून घाटमाथ्यावर जाईपर्यंत कोठेंही वस्ती आढळून येत नाहीं. ग्रीक लोकांच्या ग्रंथांतून या पर्वताचा उल्लेख असून महाभारतांतहि याच्या उत्पत्तीची कथा दिली आहे. पुराणांतरीं या पर्वतास ‘ अर्बुध ’ असें नांव आहे.

अबूचें जें महत्त्व आजकाल आहे तें तेथील सर्वांगसुंदर व हृदयंगम अशा जैन मंदिरांमुळेंच होय. जैन धर्माचीं हल्लींच्या स्थितींत जीं संस्मरणीय स्मारकें दृष्टीस पडतात त्यांपैकीं हीं जैन मंदिरें सर्वोत्कृष्ट आहेत. ज्या धर्मस्फूर्तीनें व सात्विक भक्तीनें

तीं अस्तित्वांत आलीं तिजविषयीं अत्यंत आदर वाटतो. या धर्मानें लक्षण म्हणजे त्यांत पूज्य मानिलेल्या चोवीस तीर्थकरांचें अर्चन करणें व अहिंसा धर्मानें वागून आत्म्यास निर्वाणप्राप्ति करून देणें हें होय. जैन लोकांच्या देवळांत या चोवीस तीर्थंकरांपैकीं कोणत्या तरी एका विशिष्ट तीर्थंकराच्या मूर्ती असतात.

अबूच्या पहाडावर दिलवारा या नांवानें जीं नामांकित देवालयें आहेत तीं पांच आहेत. 'दिलवारा' हा शब्द 'देउळवाडा' या शब्दाचा अपभ्रंश आहे. देउळवाडा म्हणजे देवळांचा समुच्चय. अशा तऱ्हेचे समुच्चय जैन लोकांच्या इतर क्षेत्रांत सुद्धा दिसून येतात. गिरनार पर्वतावर व पालिठाण्याजवळील शत्रुंजय टेकडीवर अशाच तऱ्हेचे देउळवाडे आहेत. अबूवरील देउळवाडा अथवा जैनमंदिरें केवळ संगमवरी दगडांच्या खाणी आहेत. या देवळांत पांढऱ्या संगमरवरी दगडावर जे अनेक देखावे खोदले आहेत त्यांचें कौशल्य व त्यांतील आकृतींत दिसून येणारें सौष्ठव व कोमलपणा हीं पाहतांच प्रेक्षकांचें मन आनंदमय होतें. हें शिल्पकलेचें रत्नभांडार पाहिलें म्हणजे हिंदुस्थानांत एकाकालीं ही कला किती पूर्णावस्थेस पोंचली होती हें स्पष्टपणें दिसून येतें. या देउळवाड्यांतील प्रमुख देवालय विमलशहा नांवाच्या राजानें इ. स. १०२२ मध्यें आदिनाथ तीर्थंकराच्या नांवानें बांधिलें. या देवळासभोंवतीं मोठी तटाची भिंत आहे. देवळाच्या मुख्य दरवाज्यासमोर एक लहान इमारत असून तीमध्यें एक हत्तीखाना आहे. दरवाज्याच्या अगदीं सन्मुख या देवळाचा पुरस्कर्ता विमलशहा याचा एक घोड्यावर बसविलेला भव्य पुतळा आहे. या पुतळ्यावर एक छत्र आहे. या पुतळ्याच्या मागें

एक संगमरवरी दगडांचा त्रिकोणाकृति स्तंभ असून त्यावर जैन तीर्थ-करांच्या मूर्ती खोदलेल्या आहेत. देवळाचा दरवाजा उघडून आंत गेल्यानंतर आसमंतात् संगमरवरी दगडांचें नकशीचें काम व भव्य प्राकार पाहिला म्हणजे चित्तवृत्ति स्तिमित होते व आपण एखाद्या काल्पनिक सृष्टीमध्यें आहोंत कीं काय असा भास होतो. आदि-नाथाच्या देवळाला लागून थोड्याच अंतरावर वस्तुपाल व तेजपाल यांनीं बांधिलेलें नेमिनाथाचें देवालय आहे. या जैन देवालयांच्या मागें जीर्ण झालेलीं लहान देवालयें अद्याप अस्तित्वांत आहेत.

निस्सीम धर्मबुद्धीशिवाय किंवा निष्काम भक्तीशिवाय अशा तऱ्हेचीं अलौकिक महाकार्यें घडवून आणणें अशक्य आहे अबूसारख्या दुर्गम पायथ्यापासून तीन हजार फूट उंचीवर संगमरवरी दगडाचें अचाट, मनोहर काम उठविणें हें असामान्य औदार्याचें दर्शक होय. अबूच्या पहाडांत संगमरवरी दगडाची खाण नाहीं. हा दगड अबूच्या खालीं सुमारें पंचवीस मैलांवरून जरीओच्या खाणींतून आणिला आहे. अंबाभवानीच्या डोंगराजवळ बखर प्रांतांत हा दगड मिळतो. परंतु हा कसा आणिला, कोणत्या वाटेनें आणिला, तो आणतांना काय श्रम पडले व किती पैसा खर्च झाला, याची कल्पना करणें अगदीं अशक्य आहे. अबूवर गाडी जाण्यास हल्लीं एकच मार्ग असून तोहि अलीकडे चांगला प्रशस्त केला आहे. यापूर्वी अबूवर चढण्याचा मार्ग अगदीं दुर्गम होता, वाटेंत झाडी पुष्कळ होती, व अघोरी-सारख्या क्रूर जातींचा संचार होता. या सर्व अडचणींतून या देवा-लयांची स्थापना ज्या पुरुषांनीं केली, त्यांचे ठिकाणीं दृढनिश्चय व स्थिरभक्ति असली पाहिजे यांत शंका नाहीं.

# २२. कृतज्ञता

पोर खाटेवर मृत्युच्याच दारा
कुणा गरिबाचा तळमळे बिचारा
दूर आई राहिली कोकणांत
सेविकेचा आधार एक हात! ॥ १ ॥

ताप त्यानें भरतांच तडफडावें
पांखरानें एकलें फडफडावें
हळू गोंजारी सेविका दयाळू
डाक्तरांचें वच शांतवी कृपाळू ॥ २ ॥

कधीं त्यानें घ्यावें न मुळीं अन्न
कुठे डोळे लावून बसे खिन्न
आणि डाक्तर येतांच गोंजराया
हाय! लागे तो घळघळा रडाया ॥ ३ ॥

एक दिन तो व्याकूळ फार झाला
आणि त्यानें पुशिलेंच डाक्तराला
'अतां दादा मरणार काय मी हो?'
तोंच लागे अश्रुची धार वाहो ॥ ४ ॥

हृदय हलुनी डोळ्यांत उभें पाणी
तरी डाक्तरची वदे करुण वाणी
दोन गोष्टी सांगून धीर देई
पुन: गोंजारुन शांतवून जाई ॥ ५ ॥

रात्र अंधारी माजली भयाण
सोसवेना जीवास असा ताण
हळुच बोलावी बाळ डाक्तराला
तोहि धर्मात्मा धांवुनीच आला ॥ ६ ॥

अतां बाळाला टोंचणार तोंच
वदे वासुनि पांखरूं दीन चोंच
" नको आतां—उपकार फार झाले !
तुम्हीं...मजला किति...गोड...वागवीलें ॥ ७ ॥

भीत...दादा...मरणास मुळीं...नाहीं !
तुम्हीं ..आ...ई !" बोलला पुढें नाहीं.
झणीं डोळे फिरविले बालकानें
आणि पुशिलीं लोचनें डाक्तरानें ॥ ८ ॥

## २३. हात लावला कीं सोनें

हावहावपुर नगरचा राजा धनधनराज अतिशय श्रीमंत, तरी पण त्याला पैशाची व सोन्याची इतकी कांहीं हांव कीं कांही पुसूं नये. उठल्यासुटल्या सोनें गोळा करायला आणि सांठवून ठेवायला पाहिजे म्हणजे राजेसाहेबांची तब्येत खूष ! कोणतीही वस्तु त्याच्या नजरेस पडूं द्या, तिची सोन्यांत किंमत किती होईल हा विचार त्याच्या मनांत पहिल्या प्रथम यायचा. आपला मुकुट, आपला राजदंड, आपला पोषाख सारांश जें जें म्हणून आपलें होतें, त्याची सोन्यांत किंमत किती आणि वापरामुळें तें रोज किती कमी होतें, इकडे त्याचें सदैव

लक्ष. सोन्याप्रमाणें दुसऱ्या कशावरही प्रेम नाहीं-पण मी चुकलों, सोन्यावर त्याचें प्रेम होतें, तितकेंच जवळ जवळ आणखी एकाच वस्तूवर त्याचें प्रेम होतें. ती वस्तु त्याची स्वतःची एक मुलगी होती ती होय. परंतु या मुलीवरचें त्याचें प्रेम, त्याचें सुवर्णावरील प्रेम अधिकाधिक वाढण्यास फारच कारण झालें. या मुलीची आई अगदीं लहानपणींच वारली होती. यामुळें तिला बापाचाच फार लळा, आणि बापाला असें वाटे कीं, हिच्यासाठींच आपण जितकें सोनें सांठवूं तितकें आपण तिचें खरें कल्याण करूं. आजपर्यंत जगांत जितकी संपत्ति एकत्र झालेली दिसली नाहीं तितकी संपत्ति, तितकी सोन्याची रास, आपण या पोरीला आपल्या पश्चात् ठेविली, तरच आपण आपलें बापाचें कर्तव्य बजाविलें. संध्याकाळीं सूर्याच्या किरणांनीं पीतवर्ण झालेले ढग जरी याच्या नजरेस पडले तरी याच्या मनांत एक विचार, "अहाहा! हे ढग दिसतात सुवर्णमय, परंतु खरोखर तसे असते, तर मीं किती आनंदात त्यांना आपल्या भांडारांत दडपून दिलें असतें!" त्याच्या मुलीनें ( तिचें नांवही त्यानें सुवर्णमयी असेंच ठेविलें होतें ) कोठें पिंवळीं सोनचाफ्याचीं फुलें तोडून आणलीं तर यानें म्हणावें, "पोरी, या फुलाचें नांव आणि वर्ण मात्र सोन्याचा, पण खरोखर हीं सोन्याचीं असतीं, तर तीं खुडून आणण्याचा उपयोग."

त्याच्या बापाच्या वेळचे पुष्कळ बाग होते. त्या बागांत नानातऱ्हेच्या फुलांचे ताटवे होते. त्यांत उत्तम प्रकारचीं फुलें येत. त्या फुलांकडे पाहून सुवर्णमयीस फार आनंद होई. परंतु धनधनराजाच्या मनांत विचार एक, 'हीं सगळीं फुलें, हीं सगळीं झाडें सोन्याचीं असतीं तर किती उत्तम झालें असतें!' व सुस्वर गाणें जरी ऐकलें

तरी त्याला वाटे, 'मोहरा एकमेकांवर पडून जो आवाज होतो त्याच्यापुढें इतर सर्व सुस्वर केवळ तुच्छ होत!'

होतां होतां इतकी स्थिति झाली कीं, धनधनराजाला सोन्याखेरीज कांहीं दिसेनासें झालें. सोन्याखेरीज कशाला आपण शिवूं नये, सोन्याखेरीज कशाचा या जगांत उपयोग नाहीं, जें काय उपयोगीं तें सोनें, असा त्याला पक्का नाद लागला. सोन्याच्या स्पर्शावांचून जो काळ घालविला तो व्यर्थ गेला असा त्याचा समज होऊं लागला आणि म्हणून त्यानें आपला सर्व सोन्याचा खजिना ज्या खोल भुयारांत ठेविला होता, त्या भुयारांत जाऊन सुवर्णभांडाराला हाताळीत बसावें. केव्हां एक पायलीभर मोहरा घेऊन त्यांत हात घालून बसावें, केव्हां एका कोपऱ्यांतून एक बारीक सूर्याचा किरण येई त्या सूर्याच्या किरणप्रकाशांत तें सोनें नेऊन त्याकडे पहात बसावें. त्यास सूर्याचा किंवा दिव्याचा प्रकाश हवासा वाटे. कां? तर त्यामुळें आपलें भांडार पाहून त्यास नेत्रसुख होई. बाकी त्या प्रकाशाचे किरण पाहूनही त्याला असें वाटेच कीं, हे सोन्याचे असते, तर किती उत्तम झालें असतें! सगळें जग—अगदीं त्यांतले कानेकोपरेसुद्धां झाडून—जेव्हां आपलें भांडारगृह होईल आणि त्यांत जिकडे पहावें तिकडे आपलें सोनें भरलेलें पाहीन तेव्हां खरें सुख असें त्यास वाटे.

एके दिवशीं धनधनराज आपल्या भुयारांत जाऊन आपल्या सुवर्णराशीच्या स्पर्शाचें व मापाचें सुख घेत होता. इतक्यांत आपल्या त्या राशीवर कोणाची तरी सावली पडलीसें त्याला दिसलें म्हणून तो वर डोकें करून पहातो, तों एका कोंपऱ्यांतून येणाऱ्या बारीक

सूर्यकिरणाच्या प्रकाशांत एक अगदींच परकी असा पुरुष उभा आहे. हा पुरुष अगदीं तरुण असून मोठा आनंदी व सुस्वरूप असा दिसला. शिवाय धनधनराजाला जिकडे तिकडे सोनेंच दिसे यामुळें म्हणा किंवा खरोखर होती म्हणून म्हणा पण धनधनराजाला असें वाटलें कीं, त्या तरुण पुरुषाच्या वर्णांत सोनेरी प्रभा फार आहे. तो पुरुष सूर्यकिरणांत उभा होता, परंतु त्याची स्वतःची प्रभा चांगली पसरल्यामुळें धनधनराजाचें सुवर्णभांडार विशेषच खुलून दिसलें. त्या पुरुषाच्या तेजामुळें अगदीं कानाकोंपरासुद्धां प्रकाशित होऊन तेथील सोनें नाणें त्यावेळीं चमकून दिसत होतें.

धनधनराजाची पक्की खात्री कीं, आपण आपल्या भांडारखान्याचा बंदोबस्त कड्याकुलुपें घालून अडसरबिडसर ओढून अगदीं उत्तम तऱ्हेनें केलेला आहे; त्यांत यत्किंचित् उणीव नाहीं; असें असून जेव्हां हा आंत आला तेव्हां हा तेजस्वी प्राणी मनुष्य खास नव्हे. शिवाय त्याच्या सत्त्वगुणावरून व आनंदमय तेजावरून हें अगदीं पक्कें होतें कीं, तो कांहीं चोरीमारी करण्यास आला नाहीं. हा आलेला प्राणी कोणी तरी अमानुष असून आपणास कांहीं तरी प्रसाद देण्याकारितां आला आहे हें खास. प्रसाद, प्रसाद तो दुसरा काय! आपल्या भांडाराची आणखी समृद्धि करावी एवढेंच धनधनराजाच्या मनांत आलें.

इतक्यांत तो तेजस्वी पुरुष धनधनराजाच्या पुढें येऊन त्याला म्हणतो, "वा! धनधनराज, तुमचें भांडार तर अगदीं भरपूर भरलें आहे. तुमच्या भांडारासारखें दुसरें भांडार सगळ्या पृथ्वींत दुसरीकडे कोठें असेल कीं नाहीं मला शंका आहे."

" आहे आपलें सरासरी झालें; आहे म्हणावयाचें आमचें भांडार. पण इतकें हें सोनें जमवायला माझा सारा जन्म घालवावा लागला हें मनांत आलें कीं, तें किती लहान आहे याबद्दल वाईट वाटतें. अहाहा ! मला जर १००० वर्षे आयुष्य होईल तर काय चैनच उडेल ! "

" काय! तर मग एकूण तुझें समाधान नाहींच अजून झालें ? "

धनधनराजानें नकारार्थी मान हलवून उदासवाणी चेहरा केला.

" बरें, तुला कशानें समाधान होईल सांग पाहू ?" तो तेजस्वी पुरुष म्हणाला, " उगीच आपलें तुझें म्हणणें काय पडतें तें समजण्यासाठींच विचारतों. "

धनधनराजानें किंचित् विचार केला. त्याला पक्कें वाटलें कीं, हा आपल्यापुढें उभा राहिलेला पुरुष अमानुष असून आपल्या इच्छा तृप्त करण्याची त्याला इच्छा आहे, आणि त्याच्या अंगीं शक्तिही आहे, तेव्हां आपण ही संधि घालवूं नये. यावेळीं आपण काय पाहिजे तें जरी म्हटलें तरी होणार आहे. तेव्हां आपण काय मागावें ? यासंबंधानें त्यानें कर कर विचार केला, युक्त्यांमागून युक्त्या आठवल्या, परंतु त्यांपैकीं एकही त्याला इष्ट हेतू पूरित करण्याजोगी वाटली नाहीं. सोन्याचे पर्वतचे पर्वत त्यानें मनांत आणले, पण त्यांनींसुद्धां त्याला संतोष होईना ! शेवटीं त्याला एकदम एक युक्ति सुचली. ती युक्ति सोन्याहूनही पिंवळी असें त्याला वाटलें. लागलीच त्यानें आपलें तोंड वर करून त्या तेजस्वी प्राण्याकडे पाहिलें. त्या पुरुषानें ताडलें आणि तो लागलीच धनधनराजास म्हणाला, " धनधनराज, ज्याच्या योगानें तुझें पुरें समा-

धान होईल, अशी युक्ति तुला सांपडल्याचें तुझ्या तोंडावरून दिसतें आहे. बोल तर मग काय ती. ''

धनधनराजानें आतुरतेनें उत्तर दिलें, '' महाराज, रोज थोडें थोडें सोनें जमवीत बसण्याचा मला अगदीं कंटाळा आला आहे. त्यांत आणखी आपण श्रम केल्याच्या मानानें किती तरी थोडा संचय झाला आहे हें पाहिलें, म्हणजे माझी फारच निराशा होते; तर माझें म्हणणें एवढेंच कीं, ज्या कशाला माझा स्पर्श होईल तें ताबडतोब सोनें व्हावें; दुसरें कांहीं नाहीं. '' तें ऐकून त्या तेजस्वी पुरुषास हसूं आलें, व त्यामुळें त्याच्या तेजाचा प्रकाश विशेषच जिकडे तिकडे फांकला.

'' काय ? ज्याला स्पर्श करशील त्याचें सोनें व्हावें अशी तुला इच्छा आहे ? वा धनधनराज, तूं शक्कल तर मोठी नामी काढलीस. याबद्दल तुझी तारीफ करावी तेवढी थोडी आहे. पण अशी शक्ति तुझ्या अंगीं आली तर तुझी तृप्ति होईल अशी तुझी खात्री आहे कां ? ''

'' त्याबद्दल शकाच नको! '' धनधनराजानें चटकन् उत्तर दिलें.

'' ही शक्ति उगीच आपल्याला प्राप्त झाली असें वाटून तुला कधीं पश्चात्ताप होणार नाहीं म्हणतोस ? ''

'' पश्चात्ताप होण्याचें कारण काय ! पूर्णपणें सुखी होण्याला दुसऱ्या कशाची मला मुळींच अपेक्षा नाहीं. मग काय ? ''

'' बरें तर, उद्यापासून तुझ्या इच्छेप्रमाणें होईल. '' तो तेजस्वी पुरुष आशीर्वाद देण्याप्रमाणें हात करून म्हणाला, '' उद्यां सकाळीं

सूर्योदय होण्याबरोबर ज्याला स्पर्श करशील तें सोनें होईल, अशी शक्ति तुझ्या अंगांत येईल."

हे शब्द धनधनराजाच्या कानावर पडतात न पडतात, तों तो तेजस्वी पुरुष अत्यंत देदीप्यमान तेजानें विशेषच तळपूं लागला. इतका कीं, त्या तेजामुळें धनधनराजाचे डोळे दिपून जाऊन त्याला ते मिटावे लागले, व पुनः तो आपले डोळे उघडतो, तों पूर्वीप्रमाणें सूर्याचा एक किरण नेहमींप्रमाणें आपल्या त्या भुयारांत पडला आहे आणि आपला सर्व जन्म खर्चून जमविलेलें भांडार पहिल्याप्रमाणेंच जेथल्या तेथें—पण आहे तेवढेंच—आहे.

त्या रात्रीं धनधनराजास रोजच्याप्रमाणें झोंप आली किंवा नाहीं कांहीं सांगतां येत नाहीं; परंतु एवढी गोष्ट खरी कीं, उद्यां तुला एक नवी बाहुली घेऊन देईन असें एखाद्या मुलीस सांगून ठेविलें म्हणजे तिला जसें सकाळ होते आहे कीं नाहीं, आणि आपल्याला बाहुली मिळते आहे कीं नाहीं असें होऊन जातें, तसेंच धनधनराजाला होऊन गेलें होतें. तो सूर्योदयाच्या पूर्वीं किती वेळ तरी जागाच होता. डोंगराच्या शिखरांवरून अरुणोदयाची प्रभा फांकली असेल नसेल, तेव्हांपासून तो जागा असून आपल्याला जी शक्ति येणार आहे ती येते कीं नाहीं याबद्दल विचार करीत होता. ती शक्ति आली कीं नाहीं हें पाहण्याला तो अतिशय उत्सुक झाला होता. म्हणून त्यानें आपल्या पलंगावरून, शेजारीं असणाऱ्या खुर्चीवरून, पांघरुणावरून, सारांश जें जें हाताशीं होतें त्याच्या-वरून आपला हात फिरविला. परंतु केवढी दुःखाची गोष्ट कीं, त्या स्पर्शाचा परिणाम कांहींच झालेला त्याला दिसला नाहीं. अर्थातच

त्याची निराशा झाली व त्याला असें वाटलें कीं, त्या तेजस्वी पुरुषाला पाहिल्याचें व त्याच्याशीं बोलल्याचें आपल्याला केवळ स्वप्नच पडलें; तें कांहीं खरें नव्हे.

—२—

सूर्योदय अद्यापि झालाच नव्हता. पूर्वदिशेकडे फक्त तांबडें फुटलें होतें. आकाशाच्या धारेजवळ मात्र उगीच किंचित् श्वेतवर्णाची छटा दिसते न दिसतेसें झालें होतें निराशासागरांत बुडून गेलेला धनधनराज आपल्या मनांत खिन्न होऊन अगदीं स्वस्थपणें वर तक्तपोशीकडे पहात होता. क्षणोक्षणीं त्याची खिन्नता अधिकाधिक वाढत चालली होती. इतक्यांत सूर्योदय झाला. सूर्याचा प्रथमकिरण खिडकींत येऊन वर तक्तपोशीवर चमकला, तें पाहून धनधनराज फारच खिन्न झाला. परंतु तितक्यांत त्याला असें वाटलें कीं, आपलें पांघरूण आज रोजच्यापेक्षां विलक्षण दिसतें आहे. त्याचा पांढरा रंग जाऊन तें सूर्यप्रकाशानें सोन्यासारखें चकचक करीत आहे. हें काय ? तो निरखून पहातो, तों आपलें पांघरूण आतां सुताचें नसून तें सुवर्णाच्या तंतूंचें झालें आहे असें त्याला दिसलें. सूर्योदयाबरोबर त्याच्या स्पर्शानें सुवर्ण होण्याची शक्ति त्याच्या अंगीं आली.

तें समजतांच धनधनराजास केवळ वेड्याप्रमाणेंच झालें. तो जिकडे तिकडे धांव मारून जें सांपडेल त्याला स्पर्श करीत सुटला. पलंगाच्या काठ्या पाहिल्या, लावला हात, कीं झाल्या त्या सोन्याच्या ! खिडकीला पडदा लावला होता त्यामुळें चांगलासा उजेड येईना,

तो आला म्हणजे आपल्या अंगीं आलेल्या त्या चमत्कारिक शक्तीचा काय प्रभाव आहे तो आपणांस चांगला दिसेल, तर तो पडदा दूर सारावा म्हणून स्वारी पडद्याजवळ गेली. पडद्याच्या गोंड्याला हात लावतो तों तो जड लागूं लागला ! त्याचें सोनें झालेलें ! पलीकडे एक पुस्तक पडलें होतें तें राजानें सहज उचललें, तों तें सोन्याच्या पत्र्यानें मढविलेल्या पुस्तकाप्रमाणें सुंदर दिसूं लागलें. त्याच्या पानाच्या कडा सोनेरी दिसूं लागल्या. त्यानें जरा पानें उलटण्याचा अवकाश, तीं सगळीं सोन्याचींच झालीं ! त्यानें घाईघाईनें आपले कपडे चढविले, तेव्हां ते सर्व सुवर्णमय असून पहिल्याप्रमाणेंच हवे तसे मृदु व घड्याबिड्या करण्याजोगे आहेत असें त्यानें पाहिलें. त्यास खूपच आनंदीआनंद झाला. मात्र ते कपडे त्याला थोडेसे जड वाटूं लागले. त्याच्या मुलीनें त्याच्यासाठीं एक सुंदरसा हातरुमाल तयार केला होता. तो त्यानें हातांत घेतला, तोही सुवर्णमय होऊन गेला. तो सुवर्णमयीनें आपल्या हातानें शिवला होता. त्याचे दोरेसुद्धां सुवर्णतंतुमय झाले !

पण काय असेल तें असो, ह्या हातरुमालाचें रूपांतर धनधनराजास आनंदकारक झालें नाहीं. त्याच्या प्रियकर मुलीनें त्याला जसा तो करून दिला होता, तसाच तो राहता तर बरें असें त्याला वाटलें.

पण असल्या यःकश्चित् गोष्टीनें आपलें मन अस्वस्थ करून घेण्यांत तात्पर्य नाहीं असें जाणून त्यानें तिकडे लक्षच दिलें नाहीं. पोषाख वगैरे झाल्यानंतर धनधनराजानें बाहेर जाण्यापूर्वीं आपली चाळिशी काढिली आणि ती नाकावर चढविली. पण काय चमत्कार ! त्या

आरशींतून त्याला कांहींच दिसेना! कारण इतर वस्तूंप्रमाणें ती सुवर्णमयी झाली! आतां? अर्थातच ती सोन्याची झाली म्हणून तिची किंमत फार वाढली, पण आरशी ह्या दृष्टीनें पहातां ती कवडीमोल झाली. तेव्हां मात्र धनधनराजास फार गैरसोय झाली. कारण किती जरी संपत्ति आपल्याजवळ झाली तरी आतां आपल्याला वस्तु साफ दिसाव्या म्हणून आरशीचा उपयोग करण्याची कांहीं शक्यता नाहीं असें त्याला दिसून आलें.

तरी पण मोठा वेदांतीपणाचा आव घालून तो आपल्याशींच म्हणतो, " त्यांत कांहीं मोठीशी हरकत नाहीं. जगांत अशी कोणतीही चांगली गोष्ट नाहीं कीं, जिच्या प्राप्तीबरोबर थोड्याबहुत गैरसोयी सोसाव्या लागत नाहींत. आपल्या स्पर्शांत जर सुवर्ण करण्याची शक्ति आली आहे तर आरशी लावावयाला सांपडत नाहीं याबद्दल कांहीं मोठेसें वाटायला नको. साधारणतः माझे डोळे माझ्या उपयोगी पडतातच. ल्याहायला वाचायला दिसायाची पंचाईत पडेल, तर आपली मुलगी सुवर्णमयी लवकरच मोठी होऊन त्या कामीं आपल्याला उपयोगी पडेल."

धनधनराजास आपल्या या नवीन शक्तीपासून इतका आनंद झाला कीं, तो त्याच्या उदरांत तर काय पण सगळ्या राज्यांत मावेना. केव्हां एकदा बाहेर जाईन आणि आपल्या शक्तीचा प्रभाव पाहीन असें त्याला झालें. म्हणून तो त्वरित निघाला आणि जिन्यावरून उतरूं लागला. तो उतरत असतां त्याचे हात जिन्याच्या कठड्याला लागले, त्याबरोबर तो कठडा सुवर्णमय झाला! तें पाहून त्याला किती तरी आनंद झाला. जिन्याच्या खालचें दार बंद होतें.

त्याची कडी त्यानें काढली, तों ती सोन्याची बनली! दाराला हात लागला, दार सोन्याचें झालें! तेथून तो बागेंत गेला आणि इकडे तिकडे पाहूं लागला, तों सुंदर सुंदर अशीं गुलाबाचीं फुलें अर्धविकसित होऊन आपल्या सुगंधानें सर्व बागेस भरून टाकीत आहेत असें त्यास दिसलें. उषःकालच्या त्या वाऱ्याच्या झुळकीवर तर त्यांची फारच बहार वाटे. त्यांचा तो अर्धविकास अत्यंत सुंदर दिसत होता. आणि तीं फुलें त्यास त्या वेळीं इतकीं मनोहर दिसलीं कीं, कांहीं वर्णन करतां येत नाहीं.

परंतु आतांच्यापेक्षांही त्यांची किंमत वाढविण्याची युक्ति धन-धनराजाच्या हातांत होती. तिच्या योगानें त्या गुलाबांची किंमत इतकी झाली असती कीं, गुलाबांची किंमत आजपर्यंत कधीं कोणी तितकी झालेली पाहिलीच नसेल. ती युक्ति करून त्या गुलाब-पुष्पांचें रूपांतर करण्याची त्यास इच्छा झाली. तेव्हां साऱ्या ताटव्याभर हिंडून त्यानें दर फुलाला, कळीला व रोपाला हात लावून आपला प्रभाव त्यांवर चालविला. तीं सर्व सुवर्णमय झालीं. कित्येकांच्या अंतर्भागीं असणारे कीटक, कित्येकांवर गुं गुं गुं गुं करणाऱ्या मधमाशा, या सगळ्यांच्या सकट त्या पुष्पांचें सुवर्णरूप झालें! तें पहातांच धनधनराजास खूपच आनंद झाला. बागेंतील सर्व फुलांचें रूपांतर करण्याचें त्याचें काम संपतें तों सूर्य बराच वर आला होता. महाराजांस सकाळच्या उपाहाराकरिता बोलावणें आलें, आणि सकाळच्या त्या ताज्या हवेंत बराच वेळ इकडून तिकडे हिंडल्याकारणानें त्यास सडकून भूक लागली होती, तेव्हां त्यानें ताबडतोब वाड्याचा मार्ग सुधारला.

राजाचें जेवण तें ! किती ऊन ऊन ! किती पौष्टिक ! नाना-तऱ्हेचे पदार्थ ताटांत वाढले असून नुसते वाफा टाकीत होते. उत्तम दूध अगदीं कडकडीत असें एका रुप्याच्या पेल्यांत ठेविलें होतें. त्याचप्रमाणें पलीकडे सुवर्णमयीच्याही ताटाचा थाट होता.

परंतु ती अद्यापि तेथें आली नव्हती. तिच्या बापानें तिला बोलविण्याविषयीं हुकूम दिला. ती येईपर्यंत आपण जेवायाचें नाहीं असा त्याचा क्रम असे. त्याचें तिच्या ठिकाणीं फारच प्रेम असे आणि आज ही अद्वितीय शक्ति आपल्या अंगीं आल्यामुळें त्याला आनंद झाला होता, त्यामुळें तर त्याचें प्रेम विशेषच दुणावलें. परंतु इतक्यांत ती जिन्यावरून येतांना मोठमोठ्यानें स्फुंदत येत आहे असें त्यानें पाहिलें.

तें पाहतांच त्याला अत्यंत आश्चर्य वाटलें. कारण सुवर्णमयी लहानपणापासून फार आनंदी स्वभावाची असे. अगदीं लहानपणा-पासून ती पोरकी पोर, परंतु कधीं रडली भेंकली नाहीं; आणि कधीं नाहीं तें आज तिनें सकाळच्याच प्रहरीं रडावें हें मोठें आश्चर्यच होय असें धनधनराजास वाटलें. तेव्हां ती पदरानें डोळे पुशीत पुशीत येतांना तिच्याकडे पाहून तो म्हणतो, "पोरी, हें ग काय हें ! कधीं नाहीं आणि आज तुला सकाळींच रडायला काय झालें ?" सुवर्णमयीनें याला उत्तर म्हणून कांहीं शब्द न उच्चारतां आपल्या हातीं असलेलें तें बागेंतून तोडून आणलेलें गुलाबाचें फूल आपल्या बापाच्या पुढें केलें, आणि ती विशेषच मोठ्यानें रडूं लागली. परंतु तें फूल तिनें पुढें करण्याबरोबर बाप मोठ्यानें म्हणतो,

" वा किती सुंदर फूल हें ! असें सुंदर सोन्याचें फूल हातांत घेऊन तुला रडायला ग काय झालें पोरी ? "

धनधनराजाचे ते शब्द ऐकून सुवर्णमयीला फारच मोठ्याने हुंदके येऊं लागून, ती म्हणते, " बाबा, बाबा, हें कसचें सुंदर फूल ? याच्याइतकें दुसरें घाणेरडें फूल मीं कधींच पाहिलें नाहीं मी उठल्याबरोबर किनई तुमच्यासाठीं फुलें आणायला म्हणून मोठ्या घाईघाईनें धांवत बागेंत गेलें. पण तिथें पाहतें तों काय ? इथून तिथून सगळीं गुलाबाचीं फुलें, हीं अशीं पिंवळीं होऊन गेलीं आहेत त्यांचा तो छानदार वास गेला, त्यांचा तो छानदार रंग गेला, सगळे कांहीं गेलें. आणखी तीं सगळीं बिचारीं अशीं हीं पिंवळीं-धमक होऊन बसलीं आहेत. काय करायचें आतां ? "

" एः ! पोरी, एवढेंचना ? मग त्याच्याकरितां रडायला ग काय झालें ? " धनधनराज एवढेंच म्हणाला. आपण आपल्या शक्तीच्या प्रभावानें या सर्व फुलांचें सोनें करून टाकिलें हें सांगावें कीं नाहीं हेंच त्याला समजेना. त्याला त्याची किंचित् लाज वाटूं लागली, म्हणून तो थोडा वेळ थांबून म्हणाला, " बस, बस पोरी, आणखी हें दूध पी, हा सांजा खा; अग वेडे, हीं सोन्याचीं फुलें झालीं म्हणजे हजारों वर्षें टिकतील तीं बरीं, कां तीं पहिलीं एका अर्ध्या दिवसांतच कोमेजून जाणारीं बरीं ? "

" इश्श मेलीं, मला नकोत हीं असलीं फुलें ! " सुवर्णमयीनें मोठ्या तिरस्कारानें तीं फुलें झुगारून देऊन म्हटलें, " त्यांना वास नाहीं आणखी त्याच्या त्या पाकळ्या किती तरी टोंचतात ! "

सुवर्णमयी नंतर आपलें दूध पिण्याला बसली, परंतु आवडतीं फुलें नष्ट झालीं म्हणून तिचें चित्त इतकें व्यग्र झालें होतें कीं, तिला कांहीं सुचेना. तिचें खाण्यापिण्याकडेसुद्धां चित्त लागेना.

इकडे धनधनराजही आपल्या जेवणाच्या कामाला लागला. पहिल्या प्रथम त्यानें दुधाचा पेला उचलला. हात लागण्याचा अवकाश, तों तो सोन्याचा झाला ! तें पाहतांच त्याच्या मनाला फारच आनंद झाला; परंतु एक काळजी उत्पन्न झाली कीं, आतां हीं आपलीं भांडीं रोजच्या जामदारखान्यांत ठेवून उपयोग नाहीं, कारण आतां तीं विशेषच मोलवान् झालीं आहेत. ' पाहूं आतां, कांहीं तरी निराळी व्यवस्था करूं, ' असें म्हणून त्यानें तें दूध तोंडाशीं नेलें; त्या दुधाला ओंठ लागताहेत तों त्याचें सोनें झालें !

" अरे बापरे ! " धनधनराज अतिशय आश्चर्यानें म्हणतो.

" बाबा, बाबा, काय झालें हो ! " सुवर्णमयी आपलें रडकें तोंड वर करून अश्रुपूर्ण डोळ्यांनीं त्याच्याकडे पाहून म्हणाली.

" कांहीं नाहीं ! पोरी, कांहीं नाहीं ! तूं आपलें दूध घे पिऊन, नाहीं तर तें थंड होईल. "

इतकें म्हणून त्यानें आपल्या पुढल्या एका ताटांतील एक सुंदर पुरी घेतली. पण काय भयंकर स्थिति ! त्याचा हात लागण्याचा अवकाश, तिचें सोनें बनलें !

आतां मात्र त्याला मोठें भय पडलें. आपल्याला जेवण मिळतें कीं नाहीं ? जेवणार कसें ? त्यानें हळूच एका साखरपाऱ्याच्या वडीला हात लावला. झाली सोन्याची वीट ! आमटीचा भुरका मारा-

यला गेला, झालें तिचें सोनें ! हात लागण्यापूर्वी जो जिन्नस खाईन म्हणून त्यानें लोभपूर्ण दृष्टीनें त्याच्याकडे पहावें, त्याला हात लावण्याचा अवकाश कीं, त्याचें सर्व सौंदर्य, सर्व खमंगपणा जाऊन सोनें व्हावें ! शेवटीं अगदीं त्रासला आणि ताटांतल्या प्रत्येक पदार्थाला त्यानें हात लावून पाहिला. त्याला वाटलें कीं, एखादा पदार्थ तरी आपल्या स्पर्शानें सोनें झाल्यावांचून राहील, आणि मग तो आपण खाऊं. पण काय उपयोग ! असा पदार्थच सांपडेना.

शेवटीं तो चिंताक्रांत होऊन मागें असा पाटाला टेंकून बसला आणि सुवर्णमयी मोठ्या आवडीआवडीनें खात होती तिच्याकडे पहात व तिच्या स्थितीबद्दल किंचित्सा हेवा मनाला वाटून तो आपल्याशींच म्हणतो, " अरेरे ! इतकें सुग्रास अन्न माझ्यापुढें असून मला तें मातीसमान अं ? मला त्याचा किंचित्सुद्धां उपयोग नाहीं ? "

इतक्यांत त्याच्या मनांत असें आलें कीं, आपण पुनः एकदा यत्न करून पहावा. आतां यावेळीं जलद जलद पदार्थ तोंडांत घालूं म्हणजे सोनें होण्याच्या आंत तो पदार्थ पोटांत जाईल. पुढल्या ताटांतील सर्व पदार्थ सुवर्णमय झाल्यामुळें त्यानें आचाऱ्यास पटकन् आणखी कांहीं आणायला सांगितलें. आचाऱ्यानें पुनः एक नुकताच वळलेला लाडू आणि पेलाभर दूध आणलें. दूध आणतांच यानें पटकन् पेला उचलला आणि जिभेला लावून घुटका घेतो तों जिभेला तर सडकून चिमटा बसलाच; पण दुधाचें सोनें होऊन तोंडांत अडकलें. तें थुंकून टाकून त्याच्याहीपेक्षां जलदी करून त्यानें लाडू उचलून संबंधचा सबंध तोंडांत कोंबण्याचा प्रयत्न केला पण उपयोग काय ? त्याचा भला थोरला जड घट्ट असा सोन्याचा गोळा बनला.

लाडू ऊन असल्यामुळें तो गोळाही ऊनच राहिला आणि असा कांहीं तोंडाला चटका बसला म्हणतां कीं, तो ठणाणा करीत सगळ्या दिवाणखान्याभर नाचूं लागला.

" बाबा, बाबा, अहो असें काय करतां! झालें काय तुम्हांला? तुमचें तोंड भाजलें कीं काय?" सुवर्णमयी फारच प्रेमानें बापाकडे जाऊन त्याला म्हणाली.

त्यावर "पोरी, पोरी, तुझ्या बापाची धडगत नाहीं त्याला काय झालें आहे कोणास ठाऊक!" असें धनधनराज तिला म्हणाला. तें अगदीं खरें. त्याची धडगत नव्हती. सोन्यासारखें सुग्रास अन्न असून त्याला तें खरोखरीचें सोनें होऊन कुग्रास झालें. त्याची श्रीमंती त्याला आतां काय उपयोगाची होती? रस्त्यांतला चिखल काढणारा मजूर दोन प्रहरच्या वेळीं आपली भाकरीकोरड्यास घेऊन खात बसला असतां त्याला जें सुख, तें धनधनराजास सोन्याच्या अन्नानें कोठून मिळणार? त्याला आतां अशी भूक लागली कीं कांहीं विचारूं नये. आतां आपलें पुढें काय होणार? घटकोघटकीं भूक तर अतोनात वाढत जाणार आणि खाणें तर अशक्य! जें कांहीं खायला जावें तें सोनें अशा स्थितींत आपण जगणार तरी कसे? एकदा त्याला असें वाटलें कीं, आतां आपण हात न लावतां दुसऱ्याकडून आपल्या घशांत कांहीं तरी ओतावें- पण न जाणों आपल्या घशाचा स्पर्श होतांच घशांत त्याचें सोनें बनलें तर!

हे सर्व विचार त्याच्या मनांत येऊन तो अतिशय दुःखावला. त्याला कांहीं सुचेना. जगांत जें काय पाहिजे तें सोनें, संपत्ति,

असा जो कांहीं विचार आपल्या मनांत होता तो बरोबर आहे काय असा किंचित् संशयही त्याच्या मनाला उत्पन्न झाला; परंतु त्या संशयास त्यानें तेव्हांच दूर सारलें. एका जेवणासाठीं अशा संपत्तीच्या इष्टत्वाविषयीं संशय घेणें हें अगदीं अयोग्य असें त्यास वाटलें. इतकेंच नव्हे तर त्या पदार्थांकडे पाहून "अहाहा ! काय आपल्या जेवणाची किंमत ! लाखों-लाखों, क्रोडों रुपये दिले, तरी असे सुवर्णमय पदार्थ मिळणें कठिण !" याच विचारांत तो निमग्न होता.

तरी पण हे असले विचार कोठपर्यंत राहणार ? भुकेनें पोटांत जसजसें काहूर माजविण्यास प्रारंभ केला, तसतसें विचारांचें तेज फिक्कें पडत चाललें. भुकेनें तो अगदींच कळंजला, तडफडूं लागला, शेवटीं कण्हूं लागला. आपल्या बापाला काय झालें हें सुवर्णमयीस समजेना. त्याची स्थिति पाहून तिला अतोनात दुःख झालें. तिच्यानें राहवेना. बापाच्या गळ्याला मिठी मारून त्याला एकदा विचारावें असें तिच्या मनांत आलें. त्याबरोबर ती बसल्या जागची उठून बापाकडे धांवली व तिनें त्याच्या गळ्याला मिठी मारली. तिचें तें प्रेम पाहून धनधनराजाला फार समाधान झालें आणि त्यानेंही मोठ्या प्रेमानें तिचें चुंबन घेतलें. आपल्या पोरीचें प्रेम म्हणजे दुनियेंतील सर्व सोन्यापेक्षांही अधिक आहे, असें त्यास त्यावेळीं वाटलें. तो मोठ्या प्रेमानें, "माझी छकुडी, माझी छोनकुली" असें म्हणून तिला उचलून घेऊं लागला—पण काय ? ती एकही शब्द बोलेना, आणि त्याला तिला उचलतांही येईना !

अरेरे ! हें काय झालें हें ! त्या दैवी पुरुषानें धनधनराजास दिलेली ही शक्ति किती घातक ! त्याचा स्पर्श होण्याबरोबर सुवर्णमयी खरोखरीच सुवर्णमयी झाली. तिचें तें अर्ध्या उमललेल्या गुलाबकळीप्रमाणें सुंदर दिसणारें मुख सुवर्णमय झालें. तिच्या नेत्रांतून निघून गालावर पडलेले अश्रुबिंदुही घट्ट होऊन जेथल्या तेथेंच थबकले. तिचे ते काळेभोर केंस सोनें बनून पिंवळे झाले. तिचें तें कोमल मृदु शरीर जें आपल्या पित्याच्या नेत्रांस इतकें आल्हाद देत असे, जें आलिंगिलें असतां त्यास सुख वाटे, तें आतां अत्यंत कठीण झालें ! काय हा भयंकर प्रसंग ! धनधनराजाच्या अत्यंत लोभाविष्टपणास बळी पडलेली ती सुवर्णमयी आतां सजीव नसून केवळ सोन्याची पुतळी झाली !

—३—

असा हृदयद्रावक देखावा आजपर्यंत मनुष्याच्या नजरेस कधीं पडला नसेल ! त्या सोन्याच्या पुतळींत सुवर्णमयीचें सर्व स्वरूप दिसत होतें. तिच्या चर्येवर शेवटीं प्रेम, खिन्नता वगैरे विकार खेळत होते तेही त्या पुतळीच्या चेहेऱ्यावर आहेत असें धनधनराजास वाटे आणि जों जों त्यास असें वाटे, तों तों त्याला अतोनात खेद होई. “ पोरी, तुझ्या भारंभार सोन्याची किंमत आणखी तुझी किंमत एक. ” असें मोठ्या प्रेमानें धनधनराज तिला नेहमीं म्हणत असे. आज तें त्याचें म्हणणें अक्षरशः खरें झालें. पण आतां त्याला त्या प्रेमळ पोरीची खरी योग्यता किती, तिची खरी किंमत किती हें ध्यानांत आल्यासारखें झालें. पृथ्वी-

तलापासून स्वर्गापर्यंत जितका म्हणून अवकाश आहे तितका सगळा भरून काढायला जितक्या सोन्याच्या राशी लागतील तितक्या सगळ्यासुद्धां त्या पोरीची बरोबरी करूं शकणार नाहींत हें त्यास पटलें. पृथ्वीवर जें काय पाहिजे तें सोनें असें धनधनराजास वाटे आणि तें आतां हवें तितकें मिळालें तरी धनधनराज किती दुःखित झाला! त्यानें किती सुस्कारे टाकले! आपल्या कपाळावर त्यानें कितीदा हात मारला! एकदा तर तो गडबडा जमिनीवर लोळलाही! बिचाऱ्या सुवर्णमयीच्या पुतळीकडे त्याला पाहावेना, आणि पाहूं नये असेंही होईना. त्या पुतळीकडे दृष्टि दिली म्हणजे त्याला कळे कीं, ही सोन्याची झाली आहे; परंतु तें त्याला खरें वाटेना. म्हणून तो पुनः आपले डोळे दुसरीकडे नेई. पुनः त्याला वाटे कीं, आतां इतका वेळ झाला, आतां कदाचित् ती पुनः पूर्ववत् झाली असेल म्हणून बराच वेळ आपले डोळे मिटून घेऊन पुष्कळ वेळानें उघडून पाही; पण काय उपयोग? कांहीं नाहीं सुवर्णमयी अक्षरशः सुवर्णमयीच राहिली होती.

धनधनराज याप्रमाणें अत्यंत दुःखाविष्ट होऊन राहिला असतां एकाएकीं दिवाणखान्याच्या दारापाशीं तो तेजस्वी पुरुष त्याच्या नजरेस पडला. त्यास पाहतांच धनधनराजानें आपले डोळे मिटले आणि तोंड खालीं घातलें. कारण आपल्याला त्या वेळीं फार इष्ट वाटलेली, परंतु आतां अगदीं अनिष्ट झालेली शक्ति देणारा तोच हा प्राणी होय, असें त्यानें तेव्हांच ओळखलें. त्या गृहस्थाच्या मोहक चेहऱ्यावर तें पूर्वींचेंच तेज तळपत होतें, आणि स्मित करून तो धनधनराजाकडे पहात होता. त्याचें देदीप्यमान तेज सुवर्णम-

यीच्या पुतळीवर पडून ती पुतळी फारच तेजस्वी दिसूं लागली. तें पाहून धनधनराज विशेषच दुःखी झाला.

इतक्यांत तो पुरुष त्याला म्हणतो, " कसें काय धनधनराज? आपलें सोनें करण्याचें काम ठीक चाललें आहेना? अमक्याला हात लावला आणि त्याचें म्हणजे सोनें झालें नाहीं असें तर झालें नाहींना?"

धनधनराजानें मोठ्या कष्टानें आपली मान हालविली आणि तो म्हणाला, " काय सांगू हो! माझ्यासारखा दुःखी प्राणी जगांत कोठें नसेल!"

" काय, तुझ्यासारखा दुःखी प्राणी जगांत कोठें नसेल? वा! खूप दुःखी बोवा तूं!" तो यक्ष मोठ्यानें हंसून म्हणाला. " अरे, मा तुला पाहिजे ती देणगी दिलीना? आतां तुला दुःखी असण्याला कारण? जें तुला अतिशय हवेसें वाटत होतें, तें तर तुला हवें तेवढें मिळेल अशी तजवीज केली, आतां..."

" अहो, सोनें मिळालें म्हणजे सगळें कांहीं संपलें असें नाही त्यांत आणखी माझ्या प्राणापेक्षांही प्रिय अशी माझी पोरगी मला नाहींशी झाली हो!" धनधनराज अतिशय दीनवाणीनें म्हणाला, व केविलवाणी मुद्रा करून त्या यक्षाकडे पाहूं लागला.

तेव्हां तो यक्ष त्याला म्हणतो, " हं! हं! तर मग एकूण हा नवीनच शोध लागला म्हणायचा आपल्याला! पाहूं बरें तर मग. पेलाभर गारसें पाणी आणि हात लावला कीं सोनें होण्याची शक्ति या दोहोंपैकीं अधिक योग्यता कोणाची?"

" गार पाणी ! अहाहा ! आतां कुठलें माझ्या नशिबीं गार पाणी ! मी आतां असाच तहानेनें तडफडून मरणार ! "

" बरें एक घांसभर अन्न आणखी सोनें करण्याची शक्ति या दोहोंत ? "

" अहो, आतां कशाला माझ्याजवळ या गोष्टी काढतां ? सगळ्या जगांतलें सोनें आणखी एक घांसभर अन्न यांची तुलना करतां कशाला ? "

" बरें, तुझी ही मुलगी आणखी ही तुझी सोनें करण्याची शक्ति यांत ? "

" नकाहो ! नका आतां या गोष्टी बोलूं ! तिच्या केसांतला एक केंस दे म्हणजे मी तुला सगळी पृथ्वी सुवर्णमय करून देतों, असें जरी मला कोणीं म्हटलें असतें, तरी मी त्याला कधीं कबूल झालों नसतों. पण आतां काय उपयोग ? "

तें धनधनराजाचें भाषण ऐकून तो तेजस्वी पुरुष विशेष गंभीर झाला आणि त्यास म्हणतो, " धनधनराज, आतां तुला थोडेंसें शहाणपण आलेंसें दिसतें. अजून तुझें सगळें काळीज सोन्याचें झालें नाहीं असें दिसतें. त्या तुझ्या हृदयाला सोन्याचा कठिणपणा आला असता म्हणजे मग मात्र तुझी स्थिति फार भयंकर म्हटली असती. पण अजून तूं ताळ्यावर आहेस, यामुळें तुला समजून येईल कीं, ज्या वस्तू ज्याला त्याला मिळण्याचा अतिशय संभव त्याच वस्तु खरोखरी अतिशय मोलवान्. त्या नसल्या तर सगळ्या जगांतली धनदौलत अगदीं कुचकामाची ! पण हें न उमजून या

धनदौलतीकरितां किती लोक प्राण टाकतात ! बोल, तुला तुझी ही सोनें करण्याची शक्ति खरोखर नकोशी झाली आहे काय ?"

"नकोशी ? अहो मला तिचा पुरा तिटकारा आला आहे. घ्या घ्या, ती काढून." असें धनधनराज फारच उत्कंठितपणानें म्हणत असतां सहज एक माशी त्याच्या नाकावर बसली आणि हा तिला वारतो, तों ती पटकन् खालीं पडली. पहातो तों ती सोन्याची झालेली ! तें पाहून 'आपल्यामुळें तिचा प्राण गेला' असें वाटून त्याला फारच दुःख झालें. तितक्यांत तो गृहस्थ त्याला म्हणतो, "तुला खरोखर ती शक्ति नको असेल तर बरोबर एक कळशी घेऊन तुझ्या बागेच्या पलीकडे नदी आहे तिच्या कांठीं जा, आणि त्या नदीच्या वहात्या पाण्यांत बुडी मार व ती कळशी त्याच पाण्यानें भर. मग जो पदार्थ पूर्वस्थितीवर यावा असें तुला वाटत असेल, त्याच्यावर तें पाणी शिंपड म्हणजे सगळें ठीक होईल. मात्र हें सगळें खरोखर मनःपूर्वक वाटून झालें पाहिजे. जर कां मनांत कांहीं कांकूं असली तर कांहीं होणार नाहीं. मग तुझ्या हांवरेपणामुळें झालेला सर्वस्वनाश तुला आजन्म भोगावा लागेल."

धनधनराजानें नम्रपणें त्या बोलण्याचा स्वीकार केला, व आपली मान खालीं घातली. पुनः तो वर पहातो तों तो तेजस्वी यक्ष गुप्त झाला.

आपण आपल्या विचित्र हावरेपणामुळें स्वतःवर आणलेल्या संकटांतून मुक्त होण्यास उपाय सांपडल्याबरोबर तो करून पाहण्यासाठीं धनधनराज अत्यंत उत्सुक असल्यामुळें त्यानें तें ताबडतोब करून टाकलें असेल किंवा नाहीं, याची आतां कोणास

शंका नकोच. त्याला आतां सोन्याच्या भांड्यांचा आणखी एकंदर सोन्याचा मोठा तिटकारा आला होता. म्हणून एक मडकें घेऊन जाण्याचा त्यानें निश्चय केला. राजेसाहेबांना मडकें पाहिजे असें ऐकण्याबरोबर चाकरमाणसांस मोठें आश्चर्य वाटलें, पण त्यांनीं तें आणून दिल्याबरोबर हा त्याला हात लावतो तों झालें त्याचें सोनें! बिचारा त्रासला. शेवटीं तसेंच तें घेऊन नदीतीरीं गेला. त्या तेजस्वी पुरुषानें सांगितलें त्याप्रमाणें होतें कीं नाहीं कोण जाणें, असा त्याला संशय आला. पण त्याचा विचार न करितां, कपडेबिपडेसुद्धा न काढतां त्यानें धाडकन् नदींत उडी घेतली. एकदा ती भयंकर शक्ति जाऊन आपली पोरगी पूर्वींप्रमाणें केव्हां होईल आणि आपल्या मुखीं अन्न केव्हां पडेल असें त्याला होऊन गेलें होतें.

बुडी मारून डोकें वर काढण्याबरोबर आधीं तें आपलें भांडें घेऊन पाण्यांत बुडवून पाणी भरायला तो उद्युक्त झाला. काय होतें, कसें होतें, याची त्याला मोठी भीति वाटत होती. शेवटीं त्यानें तें सोन्याचें मडकें पाण्यांत बुडविलें. पहातों तों तें पूर्ववत् खरो-खरीचें मडकें बनलें. त्याबरोबर त्याचें मनही प्रसन्न झालें. त्याचें हृदय सुद्धा हळूहळू सुवर्णमय अर्थात्च धातूप्रमाणें जड होत चाललें होतें. परंतु तें आतां पुनः हलकें झालेंसें त्याला वाटलें. तरी त्याला पक्का भरंवसा येईना. म्हणून त्यानें नदीकांठच्या एका गोकर्णीच्या वेलीला व तिच्या फुलांना हात लावून पाहिला. फुलें जशींच्या तशींच राहिलीं व आपलें नष्टचर्य संपलें अशी त्याच्या मनाची खात्री झाली.

तें पाण्यानें भरलेलें मडकें घेऊन तो धांवतच आपल्या वाड्याकडे आला. आपला राजा मडक्यांत पाणी घेऊन धांवत धांवत वाड्याकडे चालला आहे हें पाहून लोकांना व नोकरांना काय वाटलें असेल त्याची कल्पनाच करावी. वाड्यांत जाण्याबरोबर पहिल्या प्रथम त्यानें सुवर्णमयीच्या अंगावर तें पाणी टाकलें, हें सांगण्याची जरूर नाहींच. त्या पाण्याचा स्पर्श होतांच तिचें पूर्वस्वरूप तिला कसें प्राप्त झालें हें मोठें पहाण्याजोगें होतें. न जाणों, एखादा अवयव तसाच सोन्याचा राहील, म्हणून धनधनराज आणखी आणखी पाणी टाकीतच होता. शेवटीं ती मोठ्यानें ओरडून म्हणाली सुद्धा, "बाबा हें काय करतां? मला सगळी भिजवून टाकलीत."

इतकें ती म्हणाली, तेव्हां त्याची खात्री झाली कीं ती आपली पूर्वींची सुवर्णमयी झाली. ती कदाचित् बागेंत जाईल, तिथलीं तीं सोन्याचीं फुलें पाहून तिला दुःख होईल, म्हणून त्यानें आधीं उरलेलें पाणी गुलाबांच्या ताटव्यांवर नेऊन शिंपडलें आणि मग येऊन जेवणखाण केलें. तेव्हांपासून त्यानें सोन्याची हांव पूर्णपणें सोडली. आपला मूर्खपणा त्यानें सुवर्णमयीला सांगितला नाहीं. मात्र ती मोठी झाल्यावर तिचें लग्न झालें व पुढें तिचीं मुलें आजोबा खेळविण्यासाठीं घेत, तेव्हां त्यांना मौज म्हणून "हात लावला कीं सोनें" ही गोष्ट ते सांगत.

## २४. तरुवरा

क्षुद्र बुद्धिनें अवगणिलें तरि थोर करी उपकृती ।
दिसते तीच मला तव रिती ॥

कितीक वेळां जवळुनि गेलों, नाहिं पाहिलें तुला ।
मनीं तो राग न तूं मानिला ॥

विहंगवदनें हंका मारिल्या, जवळिं न आलों तरी ।
धरिला राग न तो अंतरीं ॥

अपराध्यावरतींही करिती संत दया अक्षय ।
दिसतो तोच तुझा निश्चय ॥

जलवृष्टीनें भिजलों आलों जवळ तुझ्या तरुवरा ।
दिला तूं प्रेमानें आसरा ॥

संकटसमयीं सहाय्य करिती संत सुजनदुर्जनां ।
नाहीं भेद मनीं सज्जना ॥

शाखाकर पसरुनी तयांच्या खालीं मज घेतलें ।
सुतासम स्नेहें सांभाळिलें ॥

फेडूं कसा उपकार तुझा मी दुर्बळ न कळे मला ।
अर्पितों पद्यसुमन हें तुला ॥

## २५. हितोपदेशांतील गोष्टी

### गिधाड आणि बोका

भागीरथीच्या कांठीं गृध्रकूट नांवाच्या पर्वतावर एक मोठें पिंपळाचें झाड होतें. त्या झाडाच्या पोकळींत दुर्दैवानें नखें व डोळे गळून गेले आहेत असा जरद्गव नांवाचा गिधाड रहात असे. त्याची दया येऊन त्याच्या निर्वाहासाठीं म्हणून त्या झाडावर रहात असलेले पक्षी आपल्या भक्ष्यांतून थोडें थोडें भक्ष्य काढून देत त्याच्यावर तो उपजीविका करी व पक्ष्यांच्या पिलांची राखण करी. एकदा पिलें गट्ट करण्यासाठीं दीर्घकर्ण नांवाचा बोका तेथें आला. त्याला येतांना पाहून पिलें घाबरलीं व त्यांनीं मोठी किलबील चालविली. ती ऐकून जरद्गवानें विचारिलें, "कोण येतो आहे तो?"

गिधाडाला पाहून दीर्घकर्ण भयानें मनांत म्हणाला, "अरेरे, मेलों. याच्या पुढून पळून जाणें तर शक्य नाहीं. जें व्हावयाचें असेल तें होवो. याच्या मनांत विश्वास उत्पन्न करून त्याच्याजवळ तर जाऊं या."

असा विचार करून त्याच्याजवळ जाऊन बोका म्हणाला, "महाराज, मी आपल्याला नमस्कार करितों." गिधाड म्हणाला, "तूं कोण?" तो म्हणाला, "मी बोका." गिधाड म्हणाला, "तर चालता हो. नाहीं तर तुला ठार करीन." बोका म्हणाला, "माझें म्हणणें ऐकून तर घ्या. मग मला मारणें योग्य वाटलें तर मारा."

गिधाड म्हणाला, " बोल, कशासाठीं आला आहेस तें. " बोक्यानें उत्तर केलें, " मी या ठिकाणीं गंगेच्या कांठावर नेहमीं स्नान करून व ब्रह्मचर्यानें राहून चांद्रायणव्रत पाळीत असतों. तुम्ही धर्मज्ञानांत निमग्न असतां अशी सर्व पक्षी माझ्यापुढें तुमची स्तुति करीत. म्हणून वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध अशा तुमच्यापासून धर्म शिकण्यासाठीं मी तेथें आलों आहें. "

गिधाड म्हणाला, " मांजराला मांस आवडतें आणि पक्ष्यांचीं पिलें येथें असतात म्हणून मीं तुला 'जा' असें म्हटलें. " तें ऐकून बोक्यानें जमिनीला व कानाला स्पर्श करून म्हटलें, " धर्मशास्त्राचा अभ्यास करून निरिच्छ झाल्यावर मीं हें अत्यंत खडतर असें चांद्रायणव्रत केलें आहे. शास्त्राशास्त्रांत कितीही मतभेद असला तरी 'अहिंसा परमो धर्मः' या तत्त्वासंबंधानें त्यांचें एकमत आहे. "

याप्रमाणें गिधाडाचा विश्वास बसवून घेऊन बोक्यानें झाडाच्या ढोकळींत तळ दिला.

नंतर दररोज पिलांवर मोहीम करून तो बोका कांहीं पिलें ढोकळींत आणी व त्यांना मारून खाऊन टाकी. अशा रीतीनें दिवस चालले होते. ज्यांचीं पिलें नाहींशीं झालीं ते पक्षी शोक करून रडूं लागले. शेवटीं आजूबाजूला तपास करण्यास त्यांनीं आरंभ केला. तें कळल्याबरोबर बोकोबांनीं ढोकळींतून बाहेर पडून तळ काढिला. इकडे पक्षी सगळीकडे बारकाईनें पहात होते. त्यांना ढोकळींत पिलांचीं हाडें सांपडलीं. तेव्हां या जरद्गवानेंच आमचीं पिलें खाल्लीं असें ठरवून सर्व पक्ष्यांनीं गिधाडाला ठार केलें.

## लोभी कोल्हा

कल्याण प्रांतांत भैरव नांवाचा पारधी रहात असे. शिकार करण्यासाठीं तो एकदा विंध्य अरण्यांत गेला. एक हरिण मारून तें घेऊन येत असतां भैरवाला एक भयंकर रानडुकर दिसलें. हरिण खालीं जमिनीवर ठेवून त्या पारध्यानें डुकराला बाण मारिला. घनघोर गर्जना करून डुकरानें धांवत जाऊन जी मुसंडी मारिली तिनें पारधी तोडलेल्या झाडाप्रमाणें जमिनीवर पडला. त्याच्या पायाखालीं चिरडून एक सापही मेला.

कांहीं वेळानें दीर्घराव नांवाचा कोल्हा भक्ष्य शोधीत फिरत असतां तेथें आला. हरिण, माणूस, डुकर व साप इतके तेथें मेलेले पाहून त्यानें विचार केला, " वाहवा, आज काय चंगळ उडाली ! यांच्या मांसावर आतां तीन महिने चैनींत जातील. तर आतां पहिल्या भुकेला स्नायूंची केलेली ही धनुष्याची बेचव दोरी खावी." असें म्हणून तो दोरी कुरतडूं लागला. दोरी तुटल्याबरोबर धनुष्य जें उडालें तें दीर्घरावाच्या मर्मी लागलें व तो मेला

## उपद्व्यापी वानर

मगध देशांत धर्मारण्याजवळच्या एका जागीं शुभदत्त नांवाच्या कायस्थानें एक मठ बांधण्यास आरंभ केला होता. तेथें सुतारानें एक तुळई करवतीनें अर्धी कापिली होती, व त्या दोन भागांमध्यें पाचर घालून ठेविली होती. तेथें वानरांचा एक कळप उड्या मारीत आला. त्यांनीं नाना प्रकारच्या चेष्टा चालविल्या. त्यांतला एक ती पाचर धरून बसला. त्याची शेपटी त्या दोन लांकडांच्या

मध्यें पडली होती. खोड्या करण्याच्या नेहमींच्या स्वभावाप्रमाणें त्या स्वारींनीं मारे धडपड करून ती पाचर ओढून काढिली. त्याबरोबर त्याची शेपटी लाकडांत अडकली. त्या कळा सहन न होऊन तो मोठमोठ्यानें आरडूं लागला. तेव्हां कामकरी धांवत आले व त्यांनीं त्याला सोडवून मुलांना खेळणें होईल म्हणून सांखळीनें बाधून ठेविलें.

## लुडबुडें गाढव

काशींत एक परीट रहात असे. एकदा उत्सव असल्यामुळें खूप मजा करून तो निजला व त्याला गाढ झोंप लागली त्या रात्रीं त्याच्या घरांत चोरी करण्यासाठीं चोर शिरला. अंगणांत परटाचें गाढव बांधलेलें होतें व कुत्रा तेथेंच बसला होता. गाढव कुत्र्याला म्हणालें, " मित्रा हें तुझें काम आहे तर मोठ्यानें भुंकून तूं आपल्या मालकाला कां जागा करीत नाहींस ? " कुत्र्यानें उत्तर केलें, " भल्या माणसा, माझ्या कामाची चर्चा करण्याची तुला काय जरूर ? मी घराची राखण रात्रंदिवस कशी करितों हें तुला माहीत नाहीं कां ? बरेच दिवस निश्चिंत झाल्यामुळें मालकाला माझा उपयोग कळेनासा झाला आहे. मला तो हल्लीं पुरेसें खावयाला देण्यांत सुद्धा कुचराई करूं लागला आहे. संकटें आलीं नाहींत तर धन्याला चाकराची पर्वा वाटेनाशी होते." गाढव म्हणालें, " अरे अप्पलपोट्या, संकटाच्या वेळीं धन्याचें काम करीत नाहींस काय ? असो. धनी जागा होईल असें मला केलें पाहिजे. " असें म्हणून मोठ्यानें ओरडण्यास त्यानें सुरवात

केली. त्या ओरडण्यानें परीट जागा झाला, व आपली झोंपमोड केली या रागावर त्यानें गाढवाला काठीनें झोडपलें.

## खुळें मांजर

उत्तर हिंदुस्थानांत अर्बुदशिखर नांवाच्या पर्वतावर महाविक्रम नांवाचा सिंह रहात असे. त्याच्या गुहेंत एक उंदीर होता. रोज सिंह निजला कीं उंदीर बाहेर येऊन त्याचें आयाळ कुरतडीत असे. आयाळ कुरतडलेलें पाहून तो सिंह अतिशय रागावे. पण बिळांत गेल्यावर त्याला तो उंदीर कसा सांपडणार ? शेवटीं सिंह जवळच्या गांवांत गेला. तेथें दधिकर्ण नांवाचा एक बोका त्यानें मोठ्या प्रयासानें शोधून काढिला. नाना प्रकारचीं आश्वासनें देऊन त्याला सिंहानें आपल्याबरोबर नेलें व मांस वगैरे चांगलें चांगलें खावयाला देऊन आपल्या गुहेंत ठेविलें. बोका आल्याबरोबर भीतीने उंदीर बिळाबाहेर पडेनासा झाला. आयाळाचे केंस कुरतडण्याचें बंद झालें. तेव्हां सिंह सुखानें झोंपी जाऊं लागला. उंदराचा आवाज ऐकिला रे ऐकिला कीं सिंह बोक्याला मांसाची चमचमीत मेजवानी देऊन खूष करी. शेवटीं एकदा फार भूक लागल्यामुळें उंदीर बिळांतून बाहेर पडला तों फिरत असतां बोक्याच्या हातांत सांपडला. बोक्यानें त्याला मारून खाऊन टाकिलें. उंदराचा आवाज जसा अगदीं मुळींच ऐकूं येईनासा झाला तसा सिंह बेफिकीर झाला. “आतां बोक्याची काय जरूर ?” असा सिंहानें विचार केला, व त्यामुळें त्याच्याकडून बोक्याला खावयाला कांहींहि मिळेना. अशा रीतीनें उपासमार होऊन शेवटीं बिचारा दधिकर्ण मरण पावला.

## चतुर कावळा

एका झाडावर एक कावळ्यांचें जोडपें रहात असे. त्यांचीं पिलें झाडाच्या पोकळींत रहाणाऱ्या काळ्या सापानें खाल्लीं. नवीं अंडीं घालण्याच्या वेळीं कावळी म्हणाली, " हें झाड सोडून आपल्याला दुसरीकडे गेलें पाहिजे. इथें हा साप आहे तोंपर्यंत आपलीं पिलें कधींहि जगावयाचीं नाहींत. "

कावळा म्हणाला, " भिऊं नको. याचे अनेक अपराध मीं आज-पर्यंत सहन केले. पण त्याची मी आतां गय करणार नाहीं. " कावळी म्हणाली, " करावयाचें काय तें कळूं द्या. " कावळा म्हणाला, " या जवळच्या सरोवरावर राजपुत्र रोज स्नानाला येतो. आंघोळीच्या वेळेस तो अंगावरचा सोन्याचा हार काढून दगडावर ठेवितो. चोंचींत धरून आणून या पोकळींत टाक. " राजपुत्र स्नानाला आला तेव्हां कावळीनें त्याप्रमाणें सर्व कांहीं बरोबर केलें. हार परत मिळविण्यासाठीं राजपुत्राचे नोकर कावळीच्या मागोमाग धांवत गेले. तेथें झाडाच्या पोकळींत काळा साप त्यांना दिसला तो त्यांनीं मारून टाकिला.

## सिंह आणि ससा

मंदर नांवाच्या पर्वतावर दुर्दान्त नांवाचा सिंह रहात होता. तो एकसारखीं जनावरें मारून खात असे. तेव्हां सर्व पशूंनीं जमून त्याला विनंति केली, " महाराज, आपण एकदम इतकीं जनावरें कां मारितां ? आपली आज्ञा होईल तर आम्हीच रोज आपल्या खाण्यासाठीं एकेक जनावर पाठवून देऊं. " तेव्हां सिंह म्हणाला, " हें जर

तुम्हांला बरें वाटत आहे तर तसें होऊं द्या." त्या दिवसापासून रोज एक जनावर त्याच्याकडे जाई व तें तो मारून खाऊन टाकी. शेवटीं एका म्हाताऱ्या सशावर पाळी आली. त्यानें विचार केला, "सावकाश गेलों म्हणून काय हरकत आहे?" सिंह भुकेनें कासावीस झाला होता तो त्याला रागानें म्हणतो, "काय रे मूर्खा सशा, इतका उशीर काय म्हणून केलास?" ससा म्हणाला, "महाराज हा माझा दोष नाहीं. मी येत असतां वाटेंत मला दुसरा एक सिंह भेटला त्यानें मला पकडिलें. 'पुनः परत येईन' असें शपथेवर त्याला सांगितलें तेव्हां त्यानें मला सोडिलें. व मी हें सर्व आपल्याला सांगण्यासाठीं येथें आलों." सिंह रागानें म्हणाला, "चल माझ्याबरोबर त्या दुष्टाकडे व तो कोठें आहे तें मला दाखव." त्याला घेऊन ससा एका खोल विहिरीजवळ गेला. "महाराज, आंत पहा म्हणजे आपल्याला तो दिसेल." असें म्हणून सशानें त्याला त्याचें प्रतिबिंब दाखविलें. रागानें बेफाम होऊन दुर्दान्तानें त्याच्यावर झडप घालण्यासाठीं उडी मारिली तोंच तो त्या विहिरींत पडला व पाण्यांत बुडून मेला.

## २६. निर्जळी एकादशी

तारुण्यांतील जोरानें सळसळणारें रक्त मंदगतीनें वाहूं लागलें, म्हणजे देहाच्या इतर क्रियांबरोबर जठराग्नीची क्रियाहि मंदपणें चालूं लागते कांद्यासारखे वातुळ पदार्थ आपोआप टाकावेसे वाटूं लागतात. चातुर्मासाचें व्रत पाळावयाची इच्छा होऊं लागते व एक-भुक्त रहाणें सहज घडूं लागतें. तारुण्यांत दांत शाबूत असतांहि घासामागून घास गिळणारा मनुष्य वयस्क झाला म्हणजे हलणाऱ्या दांतांकरवींसुद्धां चर्वणाची सक्तमजूरी करून घेतो. तारुण्यांत आजाराशिवाय सुंठीची व साबूदाण्याची आठवण न करणाऱ्या इसमास म्हातारपणीं केवळ शरीरस्वास्थ्याकरितां त्यांचा आश्रय करावा लागतो.

उत्तरवयांतील खाण्यापिण्यावरील अनासक्ति व देवधर्मावरील वाढती श्रद्धा यांचाच संयोग होऊन चातुर्मास्य, एकादशी शिव-रात्र हीं व्रतें उत्पन्न झालीं असावींत. चातुर्मास्यांत फक्त पचण्यास कठिण कठिण असे कांदे वांगी वगैरे पदार्थच निषिद्ध असतात. पण एकादशीशिवरात्रीसारख्या दिवशीं अन्नसेवन करण्याचाच—व जाज्वल्य निष्ठाव्रतासंबंधानें जलसेवन करण्याचाहि—निषेध असतो. हळूहळू हीं व्रतें म्हाताऱ्याकोताऱ्यांप्रमाणें तरण्याताठ्यांच्याहि मागें लागून मूळच्या उद्देशाचा लोप झाला; आणि कंदफलांच्या आहारास निराहार व हळदीनें पिंवळा झालेल्या भाताच्या व दूध घालून केलेल्या दशमीच्या सेवनास फलाहार या संज्ञा प्राप्त होऊन त्यांच्या निऱ्हार व फराळ या अपभ्रंशामुळें तर त्या संज्ञांचा विसंगतपणाहि भासे-

नासा झाला. म्हाताऱ्यांचीं व्रतें याप्रमाणें तरुण्यांच्या वांट्यास आल्यावर त्यांनीं त्यांत आपल्या वयोमानास अनुसरून अनेक फेरफार केले. पूर्वी जें बंधन वाटत होतें त्यास आतां सवलतीचें स्वरूप आलें. पूर्वी एकादें फळ खातांनाहि व्रत करणाऱ्या माणसास लाज वाटत असे, पण आतां केळ्यांचे सबंध घड राजरोसपणें फन्ना होऊं लागले. रताळीं, बटाटे, पेरू इत्यादि कंदफळें शीघ्रगतीनें धार्मिक उदरांचा ठाव पाहूं लागलीं. तीं खातांना चावण्याचा व चघळण्याचा शिष्टाचार तरी करावा लागतो; पण दूध, साबूदाण्याची लापशी यांस त्याचेंहि कारण नसल्यामुळें त्यांच्या वाट्यांच्या वाट्या एका दमासरशा उडविण्यांत येतात. पूर्वी वृद्धांनीं उपवासाचे दिवशीं ज्या खाद्य पदार्थांस शत्रुवत् लेखिलें, त्यांचेच तरुण वंशज त्यांस तसें लेखूनच थांबत नाहींत, तर त्यांचा क्षणार्धांत फडशाहि पाडतात. नवे नवे जिन्नस खाण्यास लालचावलेल्या जिभेचे डोहाळे पुरविण्याकरितां प्रत्येक उपवासास नवीन नवीन पक्वान्नें तयार करण्यांत येतात. वऱ्यांचे तांदूळ, भुईमुगाच्या दाण्यांची आमटी, रताळ्यांचा कीस व शिंगाड्यांचें थालीपीठ हीं जुन्या माणसांच्याहि परिचयाचीं असतात. पण साबूदाण्याची खिचडी, शिंगाड्याचा व साबूदाण्याचा शिरा, बटाट्याच्या व कच्च्या केळ्यांच्या पुऱ्या, बटाट्याचीं व शिंगाड्याचीं भजीं, साबूदाण्याच्या पापड्या, कुरडया, चिकोड्या, चिवडा, रताळ्यांच्या पाकविलेल्या चकत्या, श्रीखंडाच्या व नारळाच्या वड्या, भगरीचा साखरभात, दाण्यांचे, शिंगाड्यांच्या पिठाचे, भगरीचे व साबुदाण्याचे लाडू, तवकिलाच्या व शिंगाड्याच्या जिलब्या, रताळ्याच्या फेण्या हीं मात्र नवमत्र्या

चोंचल्यांचींच अपत्यें होत. ज्याप्रमाणें पंचमहाभूतांतून सर्व सृष्टि उत्पन्न होते, त्याप्रमाणें भगर, साबूदाणा, शिंगाडे, रताळीं व बटाटे यांतून फराळाचें वाटेल तें साहित्य तयार होऊं लागलें आहे. अलीकडे तर उपवासाच्या दिवशीं म्हाताऱ्या बायांचें सुद्धां चहाकॉफीवांचून अडूं लागलें आहे. तीं पेयें परदेशी आहेत हा त्यांसंबंधानें मोठासा आक्षेप मानण्यांत येत नाहीं. कारण बटाटेहि परदेशी असतां त्यांस उपवासाच्या दिवशीं मानाचें स्थान मिळालें आहे पूर्वी मुखशुद्धि पांढऱ्या सुपारीवर भागत असे, पण आतां लवंगा वेलदोड्यांशिवाय चालत नाहीं.

मी, बंडूनाना व पांडूतात्या यांची लहानपणापासून किती गट्टी असे, हें नव्यानें सांगण्याचें कारण नाहीं. आम्हां त्रिवर्गांचे वडील फार धर्मनिष्ठ असत. एकादशीच्या किंवा शिवरात्रीच्या दिवशीं आमच्या घरीं खाण्याचे तीन प्रकार होत. लहान मुलांकरितां रोजचें साधें जेवण, आजाऱ्याकरितां धान्यफराळ व इतरांकरितां निरशनाचा फराळ. आम्ही या तिन्ही पंक्ती साधून तिन्हीं प्रकारच्या खाद्यांस यथाशक्ति हातभार लावीत असूं. आमचे वडील अन्नाचा कण किंवा पाण्याचा थेंब न घेतां कडक उपोषण करीत असत, त्यांजकडे फिरकण्याची मात्र सोय नसे. कारण, त्या दिवशीं त्यांचें पित्त भडकून जात असे, आणि ते रागावण्याकरितां निमित्ताचीच वाट पहात असत. अशा वेळीं त्यांजकडे जाणें आणि भुकेलेल्या सिंहाच्या गुहेंत जाणें एकच होतें. एकदा मी बाबांसमोर गेलों असतां मला ढेंकर आली. आपल्या पोटांत कावळे काव काव करीत असतां हीं पोरें खुशाल ढेंकरा देत आहेत हें पाहून बाबांना इतका राग आला कीं, त्यांनीं त्याच्या-

भरांत हातांतली पंचपात्रीच मला फेंकून मारिली. थोडक्यांत चुकलें, जर कां ती पंचपात्री माझ्या डोक्यांत बसली असती, तर माझा कपाळमोक्ष होऊन एकादशीच्या दिवशीं मरण आल्यामुळें मला इच्छेविरुद्ध वैकुंठवास घडला असता. असो. हा प्रकार घडला त्याच- वेळीं पांडूतात्यांचे घरीं त्यांजवरहि तशीच आपत्ति ओढवली होती तात्यांचे वडील देवपूजेस बसले असतांना त्यांस उपोषणाच्या ग्लानी- मुळें कापराच्या डब्याचें झांकणच उघडेना. त्यांनीं आपली परा- काष्ठा करून पाहिली, दांत ओंठ चावले, डबा सर्व बाजूंनीं जमि- नीवर आपटून पाहिला पण झांकण उघडेना. तें पाहून तात्यांस किंचित् हसूं आलें. झालें तात्यांच्या वडिलाचा भडका उडाला त्यांनीं तो डबा तात्यांच्या डोक्यावर भिरकावून मारिला. त्यासरसें त्या डब्याचें झांकण निघून आंतील कापूर चारी बाजूंस उधळला, व डब्यास एक पोंचाहि आला. अशा रीतीनें रागाच्या भिरिरींत घरां- तले जिन्नस फेंकीत गेल्यास ते सारे फुटतील किंवा खराब होतील, असा पोक्त विचार तात्यांच्या वडिलांनीं केला व तेव्हांपासून ते घरां- तील जिनसांवर राग काढीनातसे झाले. सुविचारानें रागाला आळा बसतो तो असा.

बंडूनानांचे वडीलहि मनस्वी रागीट होते. पण त्यांचा राग जरा निराळ्या प्रकारचा होता. ते रागाच्या आवेशांत स्वतःच्याच जिवास त्रास करून घेत. त्यांचें कोणाशीं भांडण झालें म्हणजे ते अन्नपाणी वर्ज्य करीत व आपल्याच तोंडांत फडाफड मारून घेत. रागाच्या सपाट्यांत त्यांना सजीवनिर्जीव हा भेदहि कळत नसे. एका निरशनाचे दिवशीं ते जिना उतरत असतां त्यांचा ग्लानीमुळें

झोंक जाऊन ते जिन्यावरून खालीं पडले. त्यामुळें त्यांना त्या जिन्याचा इतका राग आला कीं, ते पांच दहा वेळां जिन्यावर चढून त्यावरून तितक्याच वेळां मुद्दाम खालीं पडले. दर खेपेस पडतांना ते जिन्यास उद्देशून 'तूं मला पाडच किती वेळां पाडतोस तो' असें पुटपुटत होते. या आततताईपणामुळें जिन्याची खोड काय मोडली असेल ती असो. नानांचे वडील मात्र हाडें मोडल्यामुळें एक महिनाभर अंथरूणावर पडून होते.

आम्हां त्रिवर्गांचे वडील ज्या दिवशीं निर्जळी एकादशी करीत, त्या दिवशीं त्यांच्या घरांतील सर्व मंडळींच्या तोंडचें पाणीहि पळून जात असे. त्या तिघांस त्या एकादशीमुळें काय पुण्य लागत असेल तें लागो. घरांतील मंडळीस मात्र आपलें मागील जन्मींचें पाप उभें राहिलें असें वाटे. ही धास्ती दुसरे दिवशीं त्यांची द्वादशी सुटेपर्यंत टिकत असे. त्यांच्या पोटांत पोळी व खीर गेली म्हणजे त्यांना आपल्या आदल्या दिवशींच्या शीघ्रकोपीपणाबद्दल पश्चात्ताप होई. गोड शब्दांपेक्षां गोड पक्वान्नांनींच रागाचें सांत्वन खरें होतें, यास याहून निराळ्या पुराव्याची काय जरूर आहे ? हा त्यांचा पश्चात्ताप पुढील एकादशीपर्यंत टिकतहि असे.

याप्रमाणें लहानपणीं निर्जळी एकादशीचा आमच्या मनास वचक बसल्यामुळें आम्ही मोठेपणीं तिचें नांव टाकिलें यांत नवल नाहीं. एकादशींतलें त्याज्य अंग याप्रमाणें टाकिल्यावर बाकीचीं अंगें आम्ही भक्तिपूर्वक पाळीत असतों. मला गोड व बंडूनानांस तिखटमिठाचे पदार्थ फार आवडत असतात. मी लापशीचा व त्यांनीं दाण्याच्या आमटीचा भुरका मारला कीं, एकादशीचा वैकुंठसुखाशीं

किती संबंध आहे, याचा आम्हाला प्रत्यक्ष अनुभव येतो. खरोखर अशीं गोड व्रतें आमच्या धर्मांत असल्यामुळेंच भाविकांकडून त्यांचें पालन योग्य प्रकारें होत असतें. साबूदाण्याच्या लापशीबद्दल कोयनेलच्या गोळ्या व दाण्यांच्या आमटीबद्दल काडेचिराइताचा काढा घेतला पाहिजे, असा जर उद्या शंकराचार्यांनीं नियम केला तर बहुतेक सारे भाविक लोक वैकुंठसुखावर लाथ मारण्याला तयार होतील यांत संशय नाहीं. एकादशीशिवरात्रीच्या व्रताच्या तोडीचें मधुर व्रत म्हटलें म्हणजे सत्यनारायणाचें. साधुवाणी कैदेंत पडल्याची व त्याचा जांवई बुडाल्याची कथा मीं शेंकडों वेळां ऐकली असेल पण ती ऐकण्याचा मला कधींच कंटाळा येत नाहीं. संध्येच्या पळीभर प्रसादाप्रीत्यर्थ गांवांत कोठेंहि सत्यनारायण असो मी तेथें भटजी येण्यापूर्वींच जाऊन बसत असतों व सारी मंडळी घरोघर परत जाईपर्यंत थांबत असतों. सत्यनारायणावर माझी इतकी भक्ति जडली आहे कीं, त्याचा प्रसाद साजूक तूप व केळीं घालून धर्मोक्त विधीनें तयार केला असल्यास, तो किती खाऊं व किती न खाऊं असें मला होऊन जातें. सत्यनारायणास आमंत्रणाची जरूरी नसते ही एक त्यांत इतर व्रतांहून विशेष वाखाणण्यासारखी बाब आहे. एकादशीप्रमाणें द्वादशीसही चमचमीत खावयास मिळतें, हा त्या व्रताचाहि एक प्रशंसनीय प्रकार आहे.

पांडूतात्यांची आवड आमच्याप्रमाणें मर्यादित नसते. पदार्थ गोड असो अगर तिखटमिठाचा असो, कच्चा असो किंवा शिजलेला असो, खाद्य असो वा पेय असो, त्याला तात्यांच्या उदार हृदयांत ठाव मिळाला नाहीं असें कधींहि झालें नाहीं. पहिल्यापहिल्यानें ते

आपल्या भक्तिभावाची तलफ, सोललेले बटाटे, केळीं व रताळीं, भुई-मुगाचे भाजलेले दाणे अशा कच्च्या मालावरच भागवीत असत. याचा अर्थ त्यांची बायको सुग्रण नव्हती असा मात्र घ्यावयाचा नाहीं. पाकशास्त्रांत तिचा हात धरणारी साऱ्या गांवांत दुसरी बाई नव्हती, पण पांडूतात्या उपासाच्या दिवशीं सकाळपासून स्वैंपाक-घरांत येरझारा घालून कच्च्या मालाचा पक्का माल करण्यास तिला सवडच देईनात, त्याला त्या बिचारीनें तरी काय करावें? शेवटीं तिनें एक शक्कल काढिली. सर्व प्रकारचा कच्चा माल एका मोठ्या टोपल्यांत घालून तो ती बैठकींत प्रातःकाळींच नेऊन ठेवूं लागली. तात्यांसारखा धिम्मा पुरुष तोच. कारण असें होऊं लाग-ल्यापासून त्यांची स्वारी फराळाच्या वेळेपर्यंत स्वैंपाकघराकडे फिर-केनाशी झाली. त्यांचा स्वभाव किती अल्पसंतोषी होता, याची अटकळ ते कच्च्या मालाच्या टोपलींतील उंसाचे करवे, भुईमुगाच्या शेंगा वगैरे साहित्य चोयट्या सालपटें यांसकट खात नसत या एकाच गोष्टीवरून करितां येईल. आहारांत इतका माफकपणा ठेविल्यावर त्यांना फराळाच्या वेळीं सडकून भूक लागत असे, यांत कांहीं नवल नाहीं. त्यांची कुशल पत्नी बटाटे, शिंगाडे यांसारख्या साध्या पदार्थांतून जीं परोपरीचीं पक्वानें करूं लागली, त्यांपैकीं एकाचाहि अनादर तात्यांकडून कधीं झाला नाहीं. त्यांच्या फराळाच्या वेळीं मी जवळ बसलेला असल्यास त्यांचें तें खाणें पाहूनच माझी तृप्ति होते व मला ढेंकरा यावयास लागतात. बरें, फराळाच्या वेळीं पांडूतात्यांचें लक्ष्य केवळ आपल्याच पानाकडे असतें असेंहि नाहीं. त्यांना आपलपोटेपणाचा गंधहि नाहीं. त्यांच्या जवळच त्यांची

मुलें भातपिठलें खात असतात, त्यांच्या पानाकडेहि या पुत्रवत्सल पित्याचें लक्ष्य असतें.

आमच्या वडिलांची उपासामुळें जशी प्राणांतिक अवस्था होई, तशी पांडूतात्यांची फराळानंतर होत असते. त्यांच्या पोटास तिडका लागत असतात त्यांचें मरण एकादशी-शिवरात्रीसारख्या उपोषणाच्या दिवशींच घडून त्यांस वैकुंठाची किंवा कैलासाची प्राप्ति होणार, याबद्दल मला मुळींच संशय वाटत नाहीं. इतक्या एकनिष्ठतेनें परलोकसाधन करणारा दुसरा सत्पुरुष विरळाच सांपडावयाचा. तात्या फराळाचें इतकें खातात, परंतु निर्जळी उपवास करण्याचा त्यांचा निर्धार असल्यामुळें ते पाण्याचा एक थेंबहि सेवन करीत नाहींत. पाणी पिण्याचा मोह होऊं नये म्हणून ते आपलें पोट इतकें कांठोकांठ भरतात कीं, त्यांत पाण्याच्या बिंदूसहि जागा रहात नाहीं. फार काय पण ते फराळानंतर अन्नपचनासाठीं जी सुंठसाखर घेत असतात, तीहि त्यांच्या घशाखालीं मोठ्या मुष्किलीनें उतरते. या सुंठसाखरेनें मात्र पोट लवकरच रिकामें होतें. त्याबरोबरच पाण्याचा घोट घेण्याचीहि इच्छा होईल या भीतीनें तात्या पोटांत झालेला खळगा पुनः पूर्वीप्रमाणेंच भरून काढितात. याप्रमाणें त्यांचें दिवसभर चालतें. दुसऱ्या दिवशीं उपासाचें पारणें फेडण्याची इतर घरीं पहांटेपासूनच धांदल चालली असते. पण आमचे विरक्त तात्या सकाळीं खाल्लेले लाडू पचत तोंपर्यंत पारण्याच्या बासुंदीपुरीस शिवत देखील नाहींत. तात्यांसारख्या पुण्यशाली महात्म्यांचें उपासाच्या दिवशीं पोट फुटून त्यांचा अंतकाळ येईल, त्यांना न्यावयास

विमान खालीं उतरेल त्या वेळीं ते आपल्या मित्रांस विसंबतील, हें शक्यच नाहीं. त्यांच्या विमानाच्या एका टोंकास मी व दुसऱ्या टोंकास बंडूनाना लोंबकळून त्यांच्या बरोबर जाऊं लागल्यास ते आम्हांस मज्जाव करणार नाहींत, अशी खात्री आहे.

## २७. कुंतीचें अभयदान

जातां देवूनि अभय निजजनकाचा पिता, महाज्ञाते।
त्याचि नगरीं द्विजगृहीं होते पाळुनि पितामहाज्ञा ते ॥ १ ॥

सिद्धान्न मातृहस्तीं देती ते वरुनि वृत्ति माधुकरी ।
भीमासि अर्ध दे ती, अर्धाचे पांच भाग साधु करी ॥ २ ॥

होते कांहीं काळ स्वीकारुनि भैक्ष्यवृत्तिला मुदित ।
तों कुंती परिसे त्या आश्रयदब्राह्मणालयीं रुदित ॥ ३ ॥

भीमासि म्हणे, ‘ रडतो दुःखें सकुटुंब विप्र बापा ! हें ।
मज बहु दुःसह झालें; आले नेत्रासि अश्रु बा ! पाहें ॥ ४ ॥

आम्हीं पक्षी, हें गृह नीड, धरादेव आश्रयागम हा, ।
दुःख हरूनि करावी प्रत्युपकृति, होय हाचि याग महा’॥ ५ ॥

भीम म्हणे, ‘ शोध करी, जा, स्वमुखें विप्रनायका पूस ।
वारीन दुःख सर्वहि, दहना अतिभार काय कापूस ?’ ॥ ६ ॥

जाय द्विजाकडे ती गाय जसी वासुराकडे मोहें ।
करितां विलाप बोलत होता निज दुःख तेधवां तो हें ॥ ७ ॥

‘ ज्याये, वदलीस परस्थळगमनविचार, सर्वथा राहो ।
माहेर येथ होतें, ओळखिती लोक सर्व थारा, हो ॥ ८ ॥
गेलों असतों तरि कां पडतें हें प्राणसंकट प्रमदे ।
स्वकुटुंबव्यसन जसें देतें न तसें बुधा विष भ्रम दे ॥ ९ ॥
जरि दान तुझें द्यावें कांते, मज भासतें तसें तरि तें ।
सिंधूदरीं विकावें स्वहितार्थ तितीर्षुनें जसें तरितें ॥ १० ॥
पुत्रचि अधिक, न कन्या, अन्यास गमे, मला न लोभ्याला ।
नयनयुगांतुनि एकहि द्याया स्वप्नीं न कोण तो भ्याला ? ॥ ११ ॥
देतों निजवपु परि तूं भीरु कसी साहशील विरहातें ? ।
स्वर्गींहि दुःसहचि जे म्हणसील मज स्मरोनि चिर ‘हा !’ ते ॥ १२ ॥
प्राणाचा त्याग बरा तुमचा न बरा, कसा न तो पापी ।
कूपांत बळें अबळां घालुनि ठकवूनि दोर जो कापी ? ’ ॥ १३ ॥
तों ब्राह्मणी म्हणे, ‘ हो कवि साधु तुम्ही करूं नका शोक ।
यन्मूल ‘ आपदर्थे ’ तो शंकरसाचि आठवा श्लोक ॥ १४ ॥
पतिपूर्वीं स्त्रीस मरण, तें लग्नाहूनि काय हो ऊन ? ।
न रहावेंचि सतीनें पळभरिहि विरूपकाय होऊन ॥ १५ ॥
रक्षाल तुम्हींच मुलें, अबळा भावील भार जीवा हे ।
रक्षील कसी अन्या नवपूरीं भीरु फार जी वाहे ॥ १६ ॥
जाइन मीच, राक्षस, जरि करकर सर्व मानवां चावे ।
दैवें स्त्री म्हणुनि दया येतां मत्प्राण कां न वांचावे ? ॥ १७ ॥
मज भक्षीलचि तो तरि विधुरपणें सर्वथा नका राहूं ।
ती स्त्री मींच; म्हणा जी ! मागें सारूनिया नकारा, हूं ’ ॥ १८ ॥

परिसे असें पृथा जों तोंचि म्हणे त्यांसि कन्यका ‘ माते ।
द्या, द्यायाचीच सुता, हे किमपि न ये चि अन्य कामातें ॥ १९ ॥
आत्मा पुत्र सखा स्त्री, कन्या चिंताचि सर्वकाळ, जिला ।
प्रसवोनि वाहति मनीं श्रीमंतहि पितर सर्व काळजिला ॥ २० ॥
‘ कन्या रक्ष्य तिघांतुनि एका ’ तुज बुध म्हणेल कां ? टाकीं. ।
बापा, कांट्यानेंचि प्राज्ञ सुखें काढितााति कांटा कीं.’ ॥ २१ ॥
ऐसें वदोनि कन्या रडवूनि रडे, तशांत जवळूनि ।
खवळूनि उठे बाळक बोले हस्तें तृणासि कवळूनि ॥ २२ ॥
समजावुनि त्यांसि म्हणे, ‘ ऐसें लात्तिंचलासि मालीन ।
कां ललतां आललतां ? पलतां मी सागलांत तालीन ’ ॥ २३ ॥
हांसविलीं हर्षविलीं व्यसनार्त तिघेंहि बाळशब्दानें ।
अब्दानें ग्रीष्मदवाकुळबर्हिकुळें जसींच अब्दानें ॥ २४ ॥
तेव्हांचि पृथादेवी भेटे, अभयोक्ति जी वदे त्यांतें ।
संजीवनीच जाणों ती रोगेंकरुनि जीव देत्यांतें ॥ २५ ॥
कुंती म्हणे, ‘ दिला तुज एक स्वसुत, द्विजा ! नकोचि रडों ।
हा शोकभर स्वशिरीं घेउनि सकुटुंब तूं नको चिरडों ’ ॥ २६ ॥
कुंती म्हणे, ‘ मदात्मज गुरुवरमंत्रें असे महातेजा ।
साहो न शकति राक्षस वज्राघातासही सहाते ज्या ॥ २७ ॥
सुरवल्लिचा, नव्हे गा क्षुद्रलतागुच्छकासम, स्तबक ।
स्पष्ट मदात्मजचरणीं अर्पील प्राणधन समस्त बक. ’ ॥ २८ ॥

## २८. कुतुबमिनार

हिंदुस्थानामध्यें ज्या लोकोत्तर व चमत्कृतिप्रचुर अशा इमारती आहेत त्यांमध्यें कुतुबमिनार ही एक आहे. ही गगनचुंबित इमारत दिल्लीपासून ११ मैलांवर आहे. ह्या इमारतीस भूकंप किंवा विद्युदाघात यांच्या योगानें थोडासा धक्का पोहोंचला आहे; तथापि ती त्या आघातांतूनहि सुरक्षित राहून आजमितीस आपल्या अपूर्वत्वानें सर्व जगास थक्क करीत आहे. पारिस येथें 'एफेल टॉवर' नामक एक प्रचंड लोखंडी मनोरा तयार करण्यांत आला आहे. तो सोडून दिला तर सर्व जगामध्यें इतका उंच मनोरा दुसरा कोणताहि नाहीं. ही इमारत जमिनीपासून २३८ फूट उंच आहे. तिच्या पायाचा व्यास ४७ फूट आहे आणि अगदीं शिरोभागाचा व्यास ९ फूट आहे. ह्या मनोऱ्याचा अगदीं तळमजला २ फूट उंचीच्या जोत्यावर असून मधली इमारत २३४ फूट आणि शेवटचा घुमटाचा पाया २ फूट उंच मिळून एकंदर वर लिहिलेली उंची येते. हा मनोरा पूर्वी ३०० फूट उंच असून त्यावर एकंदर ७ मजले होते असें म्हणतात; परंतु सांप्रत त्याच्या अगदीं शेवटच्या मजल्यासह एकंदर फक्त पांच मजले आहेत.

'कुतुबमिनार' ही इमारत मुसलमान बादशहांनीं बांधली; परंतु तिचें अवाढव्य काम मुसलमान कारागिरांनीं केलें किंवा हिंदु कारागिरांनीं केलें, हा मोठा प्रश्न आहे. गिझनीच्या महंमदानें जसें मथुरेच्या राजवाड्यांचें सामान किंवा सोमनाथाच्या देवालयाचे दरवाजे नेऊन गिझनी येथील आपला राजवाडा सुशोभित केला,

त्याप्रमाणें ह्या मिनारचें पुष्कळ नक्षीकाम हिंदूंच्या देवालयांचें असण्याचाही फार संभव आहे. या मनोऱ्यावर नागरी भाषेंत कांहीं अक्षरें कोरलेलीं आहेत, त्यांवरून या इमारतीच्या रचनेंत हिंदु शिल्पकारांचा हात होता असें म्हणण्यास पुष्टि येते. कांहींहि असो, ही इमारत हिंदुस्थानास ललामभूत आहे यांत शंका नाहीं

कुतुबमिनार इ. स. १३२५ मध्यें पूर्ण झाली यावरून आज सहाशें वर्षेपर्यंत ही इमारत दिलीच्या राजक्रांत्या व धडामोडी अवलोकन करीत आहे असें दिसून येईल. अशी ही इतिहासप्रसिद्ध कुतुबमिनार अवलोकन करून तिच्याविषयीं कोणास अभिमान व पूज्यबुद्धि वाटणार नाहीं बरें ?

कुतुबमिनार या अत्युच्च मनोऱ्यावर उभें राहून त्याच्या समंतात् भागीं दृष्टि फेंकली म्हणजे दहा कोस विस्ताराचें जें प्राचीन दिल्ली शहर होतें, त्यांतील विध्वंस पावलेल्या सहस्रावधि इमारती दृष्टीस पडतात. त्या पाहिल्या म्हणजे असें वाटतें कीं, ही कुतुबमिनार त्या सर्वांमध्यें आपण श्रेष्ठ आहों हें दाखविण्याकरितां मोठ्या ऐटीनें उभी राहिली आहे. तिची विशाल रचना, तिचें सुंदर नक्षीकाम, तिचें भव्यस्वरूप आणि तिची प्रमाणबद्ध उंची पाहून प्रेक्षकांस आनंद व आश्चर्य वाटल्यावांचून रहात नाहीं. सर्व जगांतील कबरींमध्यें ज्याप्रमाणें ताजमहाल श्रेष्ठ, त्याप्रमाणें सर्व मनोऱ्यांमध्यें कुतुबमिनार श्रेष्ठ होय. कुतुबमिनार ही इमारत एकदा पाहिली म्हणजे तिचें विस्मरण कालत्रयींहि होणार नाहीं. पारिस येथील 'एफेल टॉवर' हा मनोरा लोखंडी असल्यामुळें सोडून दिला तर आलेक्झांड्रीया येथील पांपीचा जयस्तंभ, केरो येथील हुसेनच्या

मशिदीचा मनोरा, किंवा सेंट पिटर्सबर्ग येथील ‘ आलेक्झांड्राईन कॉलम ’ या सर्व अत्युच्च इमारतींना कुतुबमिनारपुढें आपलें मस्तक नम्र करणें भाग आहे

हा मनोरा जरी इतका उंच आहे तरी त्याच्या आंतील जिना फार चांगला आहे. पांच मजल्यांपर्यंत मिळून त्यास एकंदर ३७६ पायऱ्या आहेत. आंतील बाजूस हवा व उजेड यांची सोय चांगली असल्यामुळें व प्रत्येक मजल्यावर वेगवेगळी ग्यालरी असल्यामुळें प्रेक्षकांस जागोजाग विश्रांति घेण्याची सोय आहे. प्रत्येक मजल्यावरील ग्यालरीच्या योगानें या इमारतीच्या सभोवतीं जागोजाग कंबरबंद बांधले आहेत असें वाटतें. त्यामुळें इमारतीस अप्रतिम शोभा आली आहे. याशिवाय या इमारतीवर अनेक शिल्पलेख असून त्यांमध्यें कुराणांतील वाक्यें व परमेश्वराची नाममालिका लिहिलेली आहे. या योगानें ही इमारत बांधणारांची ईश्वरभक्ति चांगली व्यक्त होते

## २९. जगीं उपमा कोणती त्या गृहातें

सुशीलेच्या शाळेस सुटी झाली
मनीं मुलगी ती फार फार धाली
म्हणे “ आतां भेटेल मला आई
बाप, भाऊ, प्रियताइ आणि माई ” १

सोडिल्याला घर दोन तीन होतां
सहा महिने जाहले पुरे आतां !

विरहदुःखाचे, कितीदा उम्हाळे
  जसे आले तैसेच दाबियेले  २

सर्व माझेपण एकवटे जेथें
  जिथें प्रेमाचें राज्य सदाचें तें;
स्वार्थ कपटाचा लेश नसे जेथें,
  जगीं उपमा कोणती त्या गृहातें ! ३

जिथें नाहीं अभिमान कुणा ठावा,
  एकमेकांची जिथें सौख्यसेवा;
जिथें परहित तें स्वहित मानवातें,
  जगीं उपमा कोणती त्या गृहातें ! ४

भिन्न मूर्तींमधिं चित्त एक जेथें
  भोगि दुःखातें अनुभवी सुखातें;
स्वर्ग वाटे हा मर्त्य लोक जेथें,
  जगीं उपमा कोणती त्या गृहातें ! ५

मनाच्या ज्या अत्युच्च, रम्य वृत्ति,
  अंकुरित त्या होऊन वाढताती;
फुलें, सुफळें येतात त्यांस जेथें,
  जगीं उपमा कोणती त्या गृहातें ! ६

वीर, पंडित, कवि, संत, सती याला
  सिद्ध करुनी जें देतसे जगाला;
सर्व संसृतिचें मूळ नांव ज्यातें
  जगीं उपमा कोणती त्या गृहातें ! ७

ज्ञान अपुलें द्यावया मानवाला
स्वयें देवें स्थापिली पाठशाला;
दिलें त्यानें गृह नाम मुदा तीतें,
जगीं उपमा कोणती त्या गृहातें ! ८

त्रिवर्गाचा सोपान सिद्ध केला
जगन्नाथें तो दिला मानवाला,
देव मंदिर आपुलें गणी ज्यातें
जगीं उपमा कोणती त्या गृहातें ! ९

## ३०. रामाचा सेतु

श्रीराम व लक्ष्मण हे दोघेहि शिकारीकरितां दूर अरण्यांत गेले आहेत, पर्णकुटींत सीता एकटी व असहाय आहे, अशी संधि साधून मदोन्मत्त रावणानें बलात्कारानें तिचें हरण केलें. तेव्हां देवीला सोडवून आणण्याकारितां व रावणाच्या जुलुमाने अत्यंत त्रस्त झालेल्या देवदानवांच्या उद्धारार्थ, श्रीरामचंद्रांना रावणावर स्वारी करावी लागली. या प्रसंगीं समुद्र तरून जाण्याकारितां श्रीरामांनीं वानर जातीच्या नलप्रभृति शिल्पज्ञांच्या देखरेखीखालीं समुद्रावर पूल बांधवून या आर्यभूमींतील सैन्य लंकेंत उतरवून त्याच्या हातून रावणाचें जुलमी राज्य लयाला नेलें आणि अशा रीतीनें आपलें व देवांचें कार्य केलें असें रामायणांत वर्णिलें आहे.

सांप्रतचें सिलोन हीच प्राचीन लंका. ही लंका व आर्यावर्त यांना जोडणारा सेतु हिंदुस्थानच्या दक्षिणटोंकाजवळ रामेश्वराच्या

शेजारीं कोठेंतरी असावा, अशी सार्वत्रिक समजूत आहे. रामाचा सेतु हल्लीं प्रत्यक्ष मुळींच दृष्टीस पडत नाहीं. रामाच्या वेळच्या सेतूचें—अर्थात् हजारों वर्षे झालेलीं असल्यानें—पूर्वींचें स्वरूप पालटून गेलें आहे. हल्लीं त्याचा अवशेष मात्र कोठें कोठें दृष्टीला पडतो. रामेश्वर व मानार या दोन बेटांना जोडणाऱ्या रेषेंत जीं हजारों वालुकामय लहानलहान बेटें आहेत तींच रामाच्या सेतूचा अवशेष होत. या बेटांच्या मालिकेच्या उत्तर व दक्षिण बाजूला खोल समुद्र असून सुमारे दीड मैल रुंदीचा भाग मात्र अत्यंत उथळ आहे. हा भाग वालुकामय असून त्या ठिकाणीं भरतीच्या वेळींही कोठें कोठें तर अवघें एक पुरुषभरहि पाणी असत नाहीं. वर सांगितलेल्या बेटांच्या मालिकेंतीलच रामेश्वर व मानार हीं दोन मोठालीं बेटें आहेत आजमितीला रामेश्वर हें एक बेट असून त्यामध्यें व हिंदुस्थानामध्यें सुमारें सवा मैल रुंदीची सामुद्रधुनी ( पंबंची सामुद्रधुनी ) आहे हें खरें; पण सुमारें पाऊणशें वर्षांपूर्वी रामेश्वर हा हिंदुस्थानचाच एक भाग असून त्या दोहोंना जोडणारी अरुंद अशी संयोगीभूमि सुस्थितींत होती, अशाबद्दल श्रीक्षेत्र रामेश्वरदेव संस्थानच्या दप्तरांत माहिती मिळते. ही संयोगीभूमि जवळजवळ समुद्रसपाटीबरोबरची असल्यामुळें त्या ठिकाणीं पुष्कळ वेळां पाणी येऊन दलदल होत असे. इ. स. १८४० सालीं एक अत्यंत भयंकर वादळ झालें. त्या वेळीं भूभागांत जे कित्येक फेरबदल झाले, त्यांतच या संयोगीभूमीचा भाग समुद्रानें कायमचा व्यापून टाकला. अशा रीतीनें रामेश्वरचा हिंदुस्थानाशीं असलेला संबंध तुटून तें एक बेट बनलें. ही रामेश्वर बेटाची हकीगत, रामेश्वर व

मानार बेट यांमधील समुद्राचा अत्यंत उथळ असलेला भाग, त्यावरील लहानलहान बेटांची रांग, या सर्वांचा विचार केला असतां असें वाटतें कीं, आर्यावर्त म्हणजे आजचें हिंदुस्थान व लंका म्हणजे सांप्रतचें सिलोन हीं फार प्राचीन काळीं अरुंदशा संयोगीभूमीनें जोडलेलीं असावीं. परंतु ही संयोगीभूमि समुद्रसपाटीपासून फारशा उंचीवर नसल्याने, व हा भाग फार दलदलीचा असल्यामुळें अत्यंत बिकट आणि धोक्याचा होता. याच संयोगीभूमीवरून तात्पुरते खांचखळगे भरून सैन्य बिनधोक जाऊं शकेल असा रस्ता श्रीरामांनीं करविल्यामुळें त्यालाच पुढें ' रामाचा सेतु ' म्हणूं लागले.

या रामाच्या सेतूची—म्हणजे सिलोन व हिंदुस्थान यांना पाण्याच्या सपाटीपासून थोड्याच अंतरावर खालून एकमेकांना जोडणाऱ्या संयोगीभूमीची—पाहणी इंग्रजसरकारकडून इ स १८३२ च्या सुमाराला करण्यांत आली. हल्लीं फ्रान्समधून इंग्लंडमध्यें जावयाचें असल्यास आगबोटीनें इंग्लिश चॅनल ओलांडावी लागते त्याचप्रमाणे हिंदुस्थानांतून सिलोनमध्यें जाणें असल्यास तुतिकोरिन् बंदरांत आगबोटींत बसून मानारची खाडी ओलांडून सिलोनमध्यें उतरावें लागे. आगबोटीच्या प्रवासापेक्षां आगगाडीचा प्रवास कमी धोक्याचा, जलद व सुखकर असल्यानें इंग्लिश खाडीखालून एक बोगदा खोदून त्यांतून आगगाडीनें इंग्लंड व फ्रान्स या दोन देशांत दळणवळण सुरू करावें, असा विचार इंग्लंडमधील बऱ्याच लोकांच्या मनांत आज कित्येक वर्षें घोळत असल्याचें बहुतेकांना माहीत असेलच. या विचाराला कृतीचें स्वरूप अजूनहि येत नाहीं, याचें कारण शिल्पशास्त्राविषयक कांहीं अडचणी हें नसून त्या दोन

देशांची राजकीय सत्ता भिन्नभिन्न आहे, हें होय. पण हिंदुस्थान व सिलोन यांच्या संबंधांत वरील प्रकारची अडचण मुळींच नाहीं. दोन्ही देशांतील साम्राज्यसत्ता एक आहे. दोन्ही देशांना जोडण्याकरितां रामाच्या सेतूचा पाया तयार आहे. याच कारणांमुळें श्रीरामांच्या सेतूच्या जागीं आगगाडीच्या रस्त्यापुरतीच भर टाकून लोहमार्ग तयार करून हिंदुस्थान आणि सिलोन संलग्न करण्याचा इंग्रजसरकाराचा विचार आज कित्येक वर्षांपासूनचा आहे

कित्येक राजकीय कारणांमुळें आगगाड्यांचा विस्तार उत्तरहिंदुस्थानांत जितक्या झपाट्यानें झाला, तितका झपाट्यानें दक्षिणहिंदुस्थानांत होऊं शकला नाहीं, पण हळूहळू थोड्याच वर्षांपूर्वी रामेश्वरच्या नजीक पण हिंदुस्थानच्या किनाऱ्यावरील मंडपम् भूशिरापर्यंत आगगाडीचा रस्ता जाऊन भिडला. रामेश्वर बेटांतहि बारापंधरा मैलांचा आगगाडीचा रस्ता तयार झाला. रामेश्वरची यात्रा बरीच सुखकर झाली. असें झालें तरी यात्रेकरूंना मंडपम् येथें गाडींतून उतरून पंबम् येथें पुनः गाडींत बसण्यापूर्वी मचव्यांची प्रार्थना करावी लागे. रेल्वे कंपनीनें पंबम्च्या सामुद्रधुनीवर पूल बांधावयाचें ठरविलें. हा पूल आतां तयार झाला आहे. हा सुमारें सवामैल लांब असून त्याला ४०।४० फुटांच्या १४५ कमानी आहेत. याशिवाय पुलाच्या साधारण मध्यावर एक २०० फूट रुंदीची मोठी कमान बसविली आहे. ही इतर कमानींप्रमाणें कायमची बसविली नसून तिच्या एका बाजूच्या खांबावर असलेल्या यंत्रांच्या सहाय्यानें ती इच्छेला येईल त्यावेळीं तिच्या दुसऱ्या खांबावरून उचलून बाजूला सारतां येते. असल्या रचनेला इंग्रजीमध्यें ' स्विंग्-

ब्रिजेस ' असें म्हणतात. या मधल्या कमानीचा उपयोग लहानलहान जहाजांना पूर्वीप्रमाणेंच मानारच्या आखातांतूनच उत्तरेकडे जातां येण्यास होऊं शकेल, कारण अशीं जहाजें पुलाच्या एका बाजूकडून दुसऱ्या बाजूला जाण्याकरितां जवळ येतांच मधील कमान बाजूला सारून त्यांना वाट देण्यांत येते. ज्या बोटींना बारा फुटांपेक्षां जास्त खोल पाण्याची जरूरी असते, अशा मोठ्या बोटींना मात्र या योजनेचा कांहीं उपयोग होणें शक्य नाहीं. कारण, या खाडीचा तळ फारच उथळ आहे. याच कारणास्तव अशा मोठ्या जहाजांना तुतिकोरिनहून मद्रासला जावयाचें असेल, तर सिलोनला वळसा घातल्याशिवाय गत्यंतर नाहीं. परंतु लहान लहान देशी जहाजे जीं बहुधा किनाऱ्याकिनाऱ्यानें हिंडतात त्यांना या स्विंगब्रिजचा फार उपयोग होईल यांत शंका नाहीं.

ज्याला रामाचा सेतु म्हणतात तो भाग सुमारें मैल सवामैल रुंदीचा व वीस बावीस मैल लांबीचा असून त्या ठिकाणीं पूर्ण भरतीच्या वेळीही कोठें कोठें तर अवघें सातआठ फूटच पाणी चढतें. सांप्रत समुद्रानें व्यापिलेल्या सेतूवर भर टाकून हिंदुस्थान व सिलोन यांना जोडणारी नवीन कृत्रिम संयोगीभूमि तयार करण्याचा विचार पुनः कांहीं कारणास्तव सरकारनें तहकूब केला आहे. वर सांगितल्याप्रमाणें पंबमच्या खाडीवर आतां पूल बांधला असल्यामुळें रामेश्वर बेटाचें आग्नेय टोंक जें धनुष्कोटी बंदर तेथपर्यंत आगगाडीनें जातां येतेंच. या ठिकाणीं समुद्रांत दक्षिण व उत्तर बाजूला दोन मोठाले भक्कम धक्के बांधण्यांत आले आहेत. त्याचप्रमाणें मानार बेटाच्या पश्चिम टोंकाला असलेल्या तालेमानार या बंदरींहि असेच

मोठे धक्के बांधलेले आहेत. या धक्क्यांला लागून मोठमोठ्या आगबोटी उभ्या राहूं शकतात. सेतूवर भर टाकून आगगाडीचा रस्ता तयार होईपर्यंत हा वीसबावीस मैलांचा प्रवास आगबोटीनेंच व्हावा, असें ठरलें आहे. आगबोटीचा मार्ग नैर्ऋत्यमोसमच्या वेळीं रामसेतूच्या उत्तरेला, पण ईशान्यमोसमच्या वेळीं त्याच्या दक्षिणेला असावा, असें ठरविण्यांत आलें आहे. या योजनेमुळें त्या त्या मोसमांतील प्रचंड वाऱ्यांमुळें आगबोट रामाच्या सेतूवर जाऊन आदळण्याचा प्रसंग येणार नाहीं मानार व सिलोन या दोहोंमध्येंहि थोडीशी लहानलहान खडकाळ बेटें आहेत, पण तीं अगदीं जवळ जवळ असल्यानें त्यांच्यावर पूल बांधून मानार व सिलोन यांचा संबंध जोडून देण्यांत आला आहे. अशा तऱ्हेनें तालेमानारपासून कोलंबोपर्यंत आगगाडीचा रस्ता असल्यानें आतां मद्रासहून कोलंबोला वर वर्णिलेल्या मार्गानें रोज नियमित प्रवाशांची, मालाची व टपालाची नेआण सुरू झाली आहे.

## ३१. घोषयात्रा

करूनि तीर्थयात्रा समग्र। द्वैतवना आले पंडुकुमार।
यावरी खल धार्तराष्ट्र। काय करिते जाहले? १

मग बोले वैशंपायन। "एकत्र होऊन दुर्जन।
दुर्योधन दुःशासन शकुनि कर्ण। विचार करिती एकान्तीं. २

'आलीं द्वादशवर्षें भरत। तेराव्यांत पांडव होती गुप्त।
पुढें युद्ध होईल प्राप्त। अति अनर्थ दिसतो पैं. ३

स्वर्गींहूनि विद्या अद्भुत । शिकोनि आला अभिमन्युतात ।
समरांगणीं कृतांत । युद्ध करूं न शकेचि. ४

प्रसन्न करून व्योमकेश । अस्त्रविद्या शिकला निःशेष ।
तैशीच वासवें निर्दोष । विद्या तयासी समर्पिली. ५

लोकपाल प्रसन्न सर्व । विद्या दिधली अपूर्व ।
निःशेष पुशिला ठाव । निवातकवचदैत्यांचा, ६

शकुनि म्हणे, 'वनांत । ते जों निजसुरे आहेत ।
रात्रीं जाऊन अकस्मात । करावा घात पांचांचा. ७

दंदशूक जों निद्रित जाण । मुख ठेचावें घालून पाषाण ।
विषवल्ली जों आहे लहान । तों उपटून टाकावी. ८

गोधनें पहावया नयनीं । घोषयात्रेचें मिष करूनी ।
गोष्टी न फुटतां द्वैतवनीं । रजनीमाजी वधावें. ९

आणि आपुली वैभवसंपत्ति । चतुरंगदळ न माय जगतीं ।
हें दाखवावें पांडवांप्रती । पाहोन होती अधोवदन. १०

दरिद्री वनांत पांडव । वैभव त्यांस दावूं सर्व ।
आमुची श्री देखोनी गर्व । हरेल त्यांचा निश्चयें. ११

उदय पावतां वासरमणी । उडुगणें लपती गगनीं ।
दृष्टीं देखतां महामणी । मग गारांसी कोण पुसे ? १२

मृगेंद्र आला ऐकोन । वारण सोडिती तात्काल प्राण ।
तैसे पांडव आम्हां देखोन । निस्तेज होती तत्त्वतां. १३

फावलें तरी टाकावें वधून । नाहीं तरी वैभवबळ दाखवून ।
यावें सर्वेचि परतोन । राष्ट्र आपुलें विलोकित.' १४

ऐसें बोलतां शकुनी । दुर्योधन आनंदला मनीं ।
श्वान जैसें वांति देखोनि । परम आवेशें धांवत १५
ऐसें शकुनीचें वचन । ऐकोन तोषे दुर्योधन ।
मग अंधाप्रति येऊन । पुसता झाला तेधवा १६
म्हणे ' घोषयात्रा करून । आपलें राष्ट्र पाहोन ।
मृगया करीत द्वैतवन । येऊं पाहोनि तैसेंचि ' १७
वृद्ध म्हणे, ' पांच पांडव । द्वैतकाननींचे कंठीरव ।
तुम्ही इभ तेथें सर्व । आपलें वैभव दावूं जातां ! १८
जागे न करावे निद्रित व्याघ्र । चेतवूं नये महाविखार ।
तरी तुम्ही जाऊन सत्वर । घोषयात्रा करून येइजे ' १९
विदुरास समजलें ते क्षणीं । दुर्जन चालिले सेना घेऊनी ।
परी तो बजबजला नाहीं मनीं । म्हणे ' यांचेनें काय होतें ? २०
रुक्मिणीनयनाब्जविकासमित्र । पाठीसी असतां पांडवमित्र ।
काय करिती दुर्जन अमित्र । दुःखास पात्र होतील ' २१
असो, इकडे कौरवभार । घोषप्रदेशीं होऊन स्थिर ।
धारोष्णपय पवित्र । प्राशन करिती यथेच्छ २२
एक तृप्त होती दधि सेवून । एक करिती मद्यपान ।
एकमेकांस आग्रह करून । पाजून मस्त जाहले. २३
तुच्छ म्हणती सुधारस । त्याहून मद्यपान विशेष ।
नाना फळें भाजून सुरस । बहु विलास दाविती २४
यावरी ते दुष्ट सकळीं । आले द्वैतारण्याजवळी ।
ज्या वनीं केळी नारळी । कर्पूरकदली डोलती २५

कृष्णागर मलयागर चंदन । सुवासें भरलेंसे गगन ।
जैसे सज्जनांचे गुण । न सांगतां प्रकटती. २६
खर्जूर कदंब रातांजन । अंजीर औदुंबर सीताफळ जाण ।
आम्रवृक्ष भेदिली गगन । सूर्यकिरण माजी न पडे. २७
जेथें वसे सदा धर्म । धर्म तेथें सुख परम ।
सुख तेथें आराम । सहज होय सकलांतें. २८
आराम तेथें वसती संत । संत तेथें आनंद बहुत ।
आनंद तेथें भगवंत । सदा रक्षित उभा असे. २९
घाला घालूं लागले रजनींत । हें जाणोन निर्जरनाथ ।
गंधर्वपतीस प्रेरित । कुंतीसुत रक्षावया. ३०
मदें धांवत कौरवभार । तो वाटे रामणिक सरोवर ।
गंधर्वराज सहपरिवार । चित्रसेन क्रीडे तेथें. ३१
दुर्योधन गजबज ऐकोन । दूतांस देई पुढें पाठवून ।
म्हणे, " मार्गावर आहे कोण । त्यांसि ताडन करून काढा. ' ३२
दूत धाविन्नले उन्मत्त । गंधर्वांसि तवकें बोलत ।
' कोण रे तस्कर तुम्ही एथ । सोडा पंथ रायातें. ' ३३
गंधर्व पुसती, ' राव कोण ? ' । म्हणती, ' पृथ्वीपति दुर्योधन ।
लवकर उठावें एथून । घेऊन प्राण पळा वेगें. ' ३४
गंधर्वी ऐसें ऐकून । दूतांस केलें बहु ताडन ।
जैशीं बिडालकें धरून । महाकुंजरें मर्दिलीं. ३५
दूत म्हणोनी सोडिले जीवंत । माघारे आले धांवत ।
अहीचे कवेंतून अकस्मात । मूषक जैसे पळाले. ३६

दोन्ही हस्ते शंख करित । सुयोधना सांगती वृत्तांत ।
‘ पर्वततुल्य अद्भुत । गंधर्व पुढें बैसले. ३७

आम्ही प्रताप वर्णितां तुझा । त्यांही केली आमुची पूजा ’ ।
ऐसें ऐकतां अंधतनुजा । क्रोध अद्भुत नाटोपे. ३८

निजभारेसा ते अवसरीं । दुर्योधन धांवे गंधर्वांवरी ।
जैसे वृषभ सिंहाचे दरीं– । माजी जाऊनि चवताळले. ३९

गंधर्वांसहित चित्रसेन । सरसावला युद्धालागून ।
बाणवृष्टि करून । कौरवसैन्य खेळिलें. ४०

चित्रसेन पंचाननापुढें । कर्णसुयोधन जंबुक बापुडें ।
मोहनास्त्र घालून वेडे । केले सर्व एकदाची. ४१

रथ तुरंग चाप तूणीर । क्षणांत कर्णाचे केले चूर ।
सुयोधनाचा स्यंदन सत्वर । तिलप्राय केला हो. ४२

एकएका कौरवाप्रति । दश दश गंधर्व धरिती ।
सुयोधना धरुनि बहुतीं । हस्त माघारे बांधिले. ४३

कर्ण पळे सत्वर । घेतलें घोर कांतार ।
मागें पुढें पाहे भयातुर । चरणीं धांवों लागला ! ४४

यजमान परम संकटीं पडे । देखोनि आश्रित पळती चहूंकडे ।
तैसे दुर्योधनाचे वीर गाढे । पळोनि गेले अष्टदिशा ! ४५

कित्येकीं शस्त्रें सांडून । आडमार्गें घेतलें रान ।
नाना सोंगें घेऊन । पळते जाहले तेधवां. ४६

द्वैतारण्यांत धांवोन । गेले कित्येक सेवक प्रधान ।
धर्मराजास वर्तमान । सांगती रडोन ते वेळां. ४७

म्हणती ‘भीमार्जुनां, शस्त्रें घ्यावीं, । तुमचे बंधु नेले गंधर्वीं !’ ।
ऐकोन हास्य केलें सर्वी । द्रौपदीधौम्यां समवेत. ४८

वृकोदर बोले स्पष्ट । ‘जेथें वसे कौटिल्य कपट ।
तेथें ईश्वर करील तळपट । अन्यायवाट देखतां.’ ४९

वैशंपायन गर्जोन बोलत । “कृष्णभक्तांचें जे विरुद्ध करीत ।
त्यांस गति हेच प्राप्त । होय निश्चयें जाणिजे. ५०

साधुसंत गोब्राह्मण । यांचा घात चिंतितां दुर्जन ।
विघ्नसमुदाय दारुण । तयांवरी रिचवती.” ५१

अजातशत्रु युधिष्ठिर । सकळ जीवांचें माहेर ।
शत्रूंचाहि हितकर । जो उदार सर्वस्वें. ५२

शांतिवैरागरींचा हिरा प्रत्यक्ष । वैराग्यवनींचा कल्पवृक्ष ।
सर्वदा कमलपत्राक्ष । अंतर्बाह्य रक्षी तया. ५३

जो विवेकरत्नांचा किरीट । ज्ञानमंदाकिनीचा लोट ।
जो स्वप्नींही नेणे कपट । तो धर्मराज धर्मात्मा. ५४

क्षमावनींचें निधान । कीं सदयतेचें उद्यान ।
लक्षूनिया भीमाअर्जून । आज्ञा जाण करितसे. ५५

‘आम्हीं पांच ते एकशत । मिळोन बंधु समस्त ।
त्यांस गंधर्व धरून नेत । पहावें विपरीत कैसें हें. ५६

त्यांस आम्हां राज्यसंबंध । म्हणोन पडलें विरुद्ध ।
आणिकें करितां त्यांसि बंध । आम्हीं अवश्य धांवावें. ५७

तरी तुम्ही लौकर धांवा । शत्रु उपकार करोनि रक्षावा ।
यशध्वज उभारावा । कौरवांसि सोडवूनी.’ ५८

मग बोले फाल्गुन । ‘ आम्हांस तों आज्ञा प्रमाण. ’ ।
सिद्ध करोनि चाऱ्ही स्यंदन । चौघेजण निघाले. ५९
भीमार्जुननकुलसहदेव । समीरापरी घेती धांव ।
तों गंधर्वीं कौरव । बांधोनि नेले अंतरिक्षीं ६०
वृषभ बांधिले दावणीं । कीं ते तस्कर धरिले वनीं ।
तैसा दीनमुख दुर्योधन नयनीं । मागें पुढे विलोकी. ६१
कृतांताचे मनीं बैसे दचक । तैशी भीमें फोडिली हांक ।
तो नाद ऐकतां देख । गंधर्वचक्र कंपित जाहलें. ६२
म्हणती, ‘ काय आले काळ । कीं उतरले लोकपाळ ! ’ ।
तों अमर्याद शरजाळ । भीमार्जुन सोडिती. ६३
पांडव आले देखोन । खालतें पाहती अंधनंदन ।
परम निर्दय दुर्जन । म्लानवदन जाहाले. ६४
गंधर्व बोलती परतोन । ‘ कां करितां युद्धकंदन ? ’ ।
पार्थ म्हणे, ‘ बंधु धरून । काय कारण न्यावया ? ६५
तुम्ही गंधर्व तस्कर । शरजाळें करूं जर्जर ।
साह्य आलिया निर्जर । करूं संहार सर्वांचा. ’ ६६
चौघे पांडव सोडती बाण । गंधर्व खिळिले संपूर्ण ।
जैसे मयूर पिच्छें पसरून । काननामाजीं विचरती. ६७
शर वर्षे चित्रसेन । परि ते न गणिती पंडुनंदन ।
जैसे बाळांचे बोल रसहीन । विद्वज्जन न मानिती. ६८
गारा पडती एकसरे । तैशीं पडतीं गंधर्वशिरें ।
मग पृथेचे तृतीयपुत्रें । संहारास्त्र सोडिलें. ६९

मग चित्रसेन पुढें होऊन । म्हणे, ‘ पार्था तूं माझा मित्रप्राण ।
तरी हें अस्त्र आवरून । घेई मागुतें तुझें तूं. ’ ७०
ऐसें वचन ऐकून मागुतें । अस्त्र आवरिलें वीरपार्थें ।
मग भेटले चित्रसेनातें । चौघे बंधु तेधवां. ७१
चित्रसेन म्हणे, ‘ अंधकुमार । महाकपटी दुराचार ।
यांचा कां घेशी कैवार । शिक्षा साचार योग्य यासी. ७२
त्रिदशेश्वरें आज्ञा करून । आणविलें त्यांस धरून ।
हे तुम्हांस वधावया लागून । येत होते रजनींत. ७३
हे घातकी तस्कर दुर्जन । यांचीं खंडावीं नासिकें करचरण ।
अथवा शिरेंच छेदून । आतांच टाकीन तवाज्ञें. ’ ७४
पार्थ म्हणे, ‘ धर्माज्ञा । अलोट आम्हांस सर्वज्ञा. ’ ।
मग पांडव आणि गंधर्वसेना । धर्मापाशीं पातली. ७५
कौरव बांधले आकर्षून । उभे केले पुढें नेऊन ।
श्रीकृष्णभगिनी येऊन । पाहती झाली कौतुकें. ७६
हांसोनि पांचाळी बोले । ‘ बरेच गंधर्वीं कौरव पूजिले ! ’ ।
दुर्योधन दुःशासन ते वेळे । अधोवदन पाहती. ७७
धर्म म्हणे, ‘ सोडा सत्वर । बंधु कष्टी जाहले समग्र. ’ ।
तें कौतुक ऋषीश्वर । भोंवताले विलोकिती. ७८
गंधर्वीं दिधले सोडून । धर्मराजाची आज्ञा घेऊन ।
स्वर्गीं गेला चित्रसेन । निजविमानीं बैसोनियां. ७९
पांडवकरें गंधर्व । पडले होते ते सर्व ।
उठविता जाहला वासव । सुधावृष्टि करोनिया. ८०

इकडे दुर्योधनास म्हणे धर्म । ‘ हें कां तुज आठवलें कर्म ?।
तस्करविद्येनें श्रम । पावलासि फार तूं. ८१

तूं जन्मोनि कुरुवंशीं । निंद्यकर्म आचरलासी ! ’
नकुलसहदेवां द्रौपदीसी । हास्य नावरे तेधवां ! ८२

## ३२. उमाबाई दाभाडे

शाहू छत्रपति साताऱ्यास राज्य करीत असतांना जोरावरखां बाबी या नांवाचा दिल्लीच्या बादशहाचा नोकर अहमदाबादेस होता. बडोद्यानजीकच्या मराठ्यांच्या मुलुखांत दंगा करून तो तिकडील ठाणीं उठवूं लागला. पेशवे व इतर सरदार दुसऱ्या स्वाऱ्यांमध्यें गुंतले असल्यामुळें जोरावरखां बाबीच्या पारिपत्यास कोणास धाडावें अशी पंचाईत पडली. तेव्हां तळेगांवीं उमाबाई दाभाडे होती. शाहूनें लिहिलें कीं, “ दोन्ही मुलांचें अल्पवय, हूड, त्यांचे संरक्षणाकरितां तुम्ही बरोबर जाऊन त्यांस आघाडीस जाऊं न देतां बाबीचें पारिपत्य करून अहमदाबादेचें ठाणें घ्यावें.” शाहूची आज्ञा प्रमाण मानून उमाबाई आपल्या मुलांसह मोहिमेस निघाली. उमाबाईच्या हाताखालीं मराठे आपल्यावर चालून येत आहेत असें कळतांच बाबीनें उमाबाईच्या नांवें एक पत्र लिहून कळविलें कीं, “ तूं विधवा बायको आहेस, तुझीं मुलें लहान आहेत, त्यापेक्षां आपली फौज घेऊन माघारी जा.” हा कुत्सित निरोप ऐकून उमाबाईस क्रोध आला. तिनें सर्व सरदारांस एकत्र जमविलें व समोर बांगड्या कुंकू ठेवून ती म्हणाली, “ मी बायको माणूस असतां पठाणांनीं दुर्भा-

षणांचीं पत्रें लिहलीं आहेत. त्यापेक्षां मी अहमदाबादेच्या राजवाड्यांत जाऊन अन्न घेईन, मध्यें घेणार नाहीं. तुम्हांस तुमच्या अन्नाची शरम असल्यास आमचे समागमें यावें. मरणास भीत असल्यास बांगड्या हातांत घालून कुंकू लावून आपल्या कुटुंबांत जावें." हें वीरश्रीचें भाषण ऐकून सर्व सरदारांस आवेश चढला व मुजरे करून ते बोलले, " आम्हीं आपलें निमक खाल्लें आहे त्यापेक्षां मरून जाऊं, पण माघारे फिरणार नाहीं. आपण मौज पहावी." मग मरूं किंवा मारूं या आवेशानें मराठी सैन्य अहमदाबादेवर चाल करून जाऊं लागलें. उमाबाई हत्तीवर स्वार झाली होती व तिनें हातांत पिस्तुल, पेषकबज व तलवार घेतली होती. तिच्या दोहोंबाजूंस दोघां मुलांचे हत्ती चालले होते. दहा हजार स्वारांनिशीं बाबी लढण्यास आला. मग मराठे व मोंगल यांची मोठ्या निकराची लढाई झाली. निरुपाय होऊन बाबी अहमदाबाद शहरांत जाऊन दरवाजे लावून बसला. त्यावेळीं मराठ्यांस मोठा आवेश चढला होता. त्यांनीं समरांगणावरचीं प्रेतें उचलून तटाबाहेर दरवाजाजवळ त्यांचा ढीग केला; व वर चढून किल्ल्याच्या दरवाजास वरून खालून आग लावून दिली. मराठे आंत उतरले. बाबीस तर पळतां भुई थोडी झाली. अस्तमानाच्या समयास मराठ्यांचीं निशाणें किल्ल्यावर फडकूं लागलीं. याप्रमाणें ठाणें सर केल्यावर उमाबाईनें अन्नग्रहण केलें. मग शहराचा बंदोबस्त करून उमाबाई आपल्या मुलांसह साताऱ्यास गेली. शाहूस तिचा पराक्रम पाहून अत्यंत आनंद झाला. त्यानें सोन्याचे तोडे उमाबाईस बक्षीस दिले व हत्ती, घोडे, वस्त्रें, भूषणें देऊन पावसाळ्याची छावणी तळेगांवास करण्यासाठीं निरोप दिला.

## ३३. उद्यांचा वीर

सौंदर्य मुखावर नाचे
पावित्र्य झळकतें वाचें । सहज तें
दाटलें वीर्य अंगांत
रक्तिमा कपोलीं येत । मोहक
हत्तीचें बल त्या खासें
चापल्यें सिंहहि भासे । गरुड वा
वर्गांत धीर गंभीर
खेळांत वीर चौफेर । अजित तो
सत्याचा घेई छंद
शाळेंत मूर्त आनंद । बाळ तो
रविचंद्र धराया पाही
त्या अशक्य कांहीं नाहीं । या जगीं
परिसाचा त्याचा हात
मातीचें सोनें होत । स्पर्शितां
यत्नांच्या नावेवरुनी
भवनदी सहज तो तरुनी । जातसे
श्वापदें संकटें क्रूर
करि त्यांचा चक्काचूर । विक्रमें
आज तो
बाळ शोभतो
वीर वाटतो
उद्यांचा खास । उद्यांचा खास
आणितो देश उदयास । धन्य तो
तो धन्य तयाची माता
हर्षवी गुरु-पिता-चित्ता । दर्शनें ॥

## ३४. हा हिंददेश माझा

आनंदकंद ऐसा । हा हिंददेश माझा ॥
सत्यासि ठाव देई । वृत्तीस ठेवि न्यायी,
सत्वास मानि राजा, । हा हिंददेश माझा. ॥
जगदीश जन्म घेई । पदवीस थोर नेई,
चढवी स्वधर्म साजा । हा हिंददेश माझा ॥
जनकादि राजयोगी । शुक, वामदेव त्यागी,
घुमवीति कीर्ति वाजा । हा हिंददेश माझा ॥
दमयंति, जानकी ती । शीलास भूषवीती
नटली नटेश गिरिजा, । हा हिंददेश माझा ॥
विश्वास मोह घाली । ऐशी मुकुंदमुरली
रमवी जिथें निकुंजा, । हा हिंददेश माझा ॥
गंगाहिमाचलाची । वसती जिथें सदाची,
होऊनि राहि कलिजा । हा हिंददेश माझा ॥
पृथुराज, सिंह, शिवजी । स्वातंत्र्यवीर गाजी
करिती रणांत मौजा; । हा हिंददेश माझा ॥
तिलकादि जीव देही । प्रसवूनि धन्य होई,
मरती स्वलोककाजीं । हा हिंददेश माझा ॥
जगिं त्याविना कुणीही । स्मरणीय अन्य नाहीं,
थोरांत थोर समजा । हा हिंददेश माझा ॥
पूजोनि त्यास जीवें । वंदोनि प्रेमभावें,
जय नाद हाचि गर्जा । ‘ हा हिंददेश माझा ’॥

## ३५. संसार कीं वैराग्य

एके समयीं तुकारामबावा लोहगांवास येऊन रात्रीस बरोबर कीर्तनें करीत आहेत असें ऐकून, महाराज त्यांपैकीं एक श्रवण करावयास एकदा आपल्या बरोबरच्या लोकांसह गेले. कीर्तनास आरंभ होऊन पहिलें मंगलाचरणच अशा थाटानें सुरू झालें कीं, तें ऐकून महाराज अगदीं थक्क होऊन गेले. भाविक श्रोत्यांचीं चित्तें प्रेमभरानें उचंबळून जो तो देहभान विसरून टाळ्या-चुटक्या वाजवीत व मुखानें विठलनामोच्चरण करीत नाचूं लागला. असा अद्भुत भक्तिरस महाराजांनीं पूर्वीं कधींही अनुभवला नव्हता. पुढें प्रतिपादन सुरू झालें. त्यांत तुकारामबावांनीं वैराग्यवृत्तीचें महत्त्व व लक्षण वर्णन करून, ' विठलावांचून ह्या विश्वामध्यें दुसरें कांहींच थोर नाहीं; आपल्या जीविताचें सार्थक ज्यास करावयाचें असेल, त्यानें विठलभक्तीचा सोपा मार्ग स्वीकारावा, ' असा अनेक दाखले देऊन व मधून मधून तात्कालिक स्फूर्तीनें प्रासादिक अभंग म्हणून श्रोत्यांस बोध केला. ऐहिक वैभवाची व ऐश्वर्याची अस्थिरता, विषयसुखाची अनर्थावहता व जीविताची क्षणभंगुरता, श्रोतृवृंदाच्या मनांत पूर्णपणें ठसण्यासारखा त्यांचा तो बोध श्रवण करून महाराजांच्या चित्तवृत्तींत विलक्षण पालट झाला. ते मुळचेच भाविक व सुवृत्त असल्यामुळें तुकारामबावांचें तें बोधामृतप्रचुर वक्तृत्व श्रवण करून त्यांचें चित्त तल्लीन झालें, आणि त्यांच्या उपदेशानुसार वर्तन केल्यास निःसंशय कैवल्यप्राप्ति होईल, अशी त्यांच्या प्रेमळ व ऋजु अंतःकरणाची तत्काळ खात्री झाली.

कीर्तन आटोपल्यावर बावांचा निरोप घेऊन महाराज आपल्या मुक्कामास गेले, व तेथून उठून रानांत एकांतीं जाऊन बसले व बावांच्या बोधाचे मनन करूं लागले. ही त्यांची वृत्ति पाहून बरोबरचे कारभारी त्यांच्याकडे जाऊन, ही अशी उपरति ह्या वयांत आपणांस होणे उचित नव्हे, असा त्यांच्याशीं बुद्धिवाद करूं लागले. हे त्यांचें बोलणें महाराजांनीं मुळीं मनास आणिलें नाहीं. त्यांनीं त्यांस असें निक्षून सांगितलें कीं, तुम्ही कोणी माझ्याकडे येऊं नका. तुम्हांला वाटेल तशी माझ्या दौलतीची व्यवस्था करा. मला त्यांत इत:पर मुळींच मन घालणें नाहीं. आयुष्य क्षणभंगुर आहे, तें केव्हां संपेल याचा नियम नाहीं, यास्तव माझ्या जन्माचें सार्थक मला ह्या क्षणापासूनच करावयास लागलें पाहिजे. राजसाधनाच्या जंजाळास लागून मीं मोक्षसुखास अंतरावें, हें मला मुळींच योग्य वाटत नाहीं. हें महाराजांचें भाषण ऐकून कारभारी मंडळीस मोठी चिंता उत्पन्न झाली; आणि त्यांनीं ही सगळी हकीकत जिजाबाईमातुश्रीस लिहून कळविली. तेव्हां ती लागलीच शिबिकेंत बसून लोहगांवास आली आणि पहिल्यानें तुकारामबावांच्या दर्शनास जाऊन तिनें त्यांना हात जोडून व पदर पसरून अशी विनंति केली कीं, ‘ स्वामी महाराज, माझा पुत्र शिवाजी आपलें कीर्तन ऐकून विरक्त झाला आहे, आणि संसाराचा त्याग करून वनांत जाऊन बसला आहे. त्यानें संपादिलेलें राज्य आतां कोण संभाळील बरें ? तेव्हां ह्या गोष्टीकडे नजर पुरवून त्यास राज्यसाधनाचा उद्योग न सोडण्याविषयीं बोध करावा.’ हें तिचें नम्रतेचें भाषण ऐकून तुकारामबावांनीं तिला आश्वासन दिलें आणि सांगि-

तलें कीं, ' शिवाजीमहाराज नेहमींप्रमाणें आज रात्रीं कीर्तनास येतील, त्यावेळीं मी त्यांना दोन गोष्टी सांगून त्यांचें मन पुन्हां संसाराकडे लागेसें करतों. '

ह्याप्रमाणें व्यवस्था करून जिजाबाई रात्रीं बावांच्या कीर्तनास येऊन बसली. महाराजही नित्यनियमाप्रमाणें कीर्तनास आले. ह्या प्रसंगीं बावांनीं कर्मकांडाचें प्रयोजन काय आहे तें सांगून, ज्यानें त्यानें आपापल्या धर्माप्रमाणें वर्तन करावें यांतच खरें श्रेय आहे, असें प्रतिपादन केलें. हरिभक्तीसाठीं संसाराचा त्याग करून वनांत जाऊन बसण्याचें कांहीं एक कारण नाहीं. जनांत राहून आपला संसार नेकीनें व माणुसकीनें चालवून आपल्या बांधवांच्या सुखांत शक्त्यनुसार भर घालण्यास अहर्निश झटावें, यांत खरा मर्दपणा आहे, आपल्या सभोंवतालच्या जनांची सर्व प्रकारें वाईट स्थिति प्रतिक्षणी दृष्टीस पडत असतां, अशा विपन्न जनांचा त्याग करून केवळ स्वमोक्षासाठीं गिरिकुहरांत जाऊन बसण्यांत मुळींच पुरुषार्थ नाहीं; आणि स्वजनकल्याणाच्या हेतूनें संसारांत रहावयाचें म्हटलें, म्हणजे गृहस्थाश्रमासारखा दुसरा आश्रम मनुष्यास हितप्रद होणें नाहीं. जगास कंटाळून, बायकामुलांचा त्याग करून व सर्वांगास राख फांसून जे विरक्त होतात, त्यांच्या हातून इंद्रियांचें दमन न होऊन ते पुनः पुनः मोहवश होतात, आणि जनांच्या अधिक्षेपास पात्र होतात. अशा विटंबना पावणाऱ्या मनुष्यास कोठेंच मान नाहींसा होतो, व तो खऱ्या मोक्षसुखासही आंचवतो. तेव्हां तात्पर्य काय कीं, गृहस्थाश्रमाचा त्याग करून गोसावी बनून इतस्ततः भ्रमण करीत राहण्यापेक्षां संसारांत राहून नीतीनें वागावें व परो-

पकार आणि हरिभक्ति करण्यांत आयुष्य घालवावें, हें विशेष चांगलें, ह्याप्रमाणें सर्वसाधारण असा बोध करून तुकारामबावांनीं राजाच्या कर्तव्यासंबंधानें थोडेसें विवेचन केलें. त्यांत त्यांनीं असें दाखवून दिलें कीं, राजा जर सदाचारी व प्रजापालनदक्ष असला, तर त्याच्या हातून लोककल्याण पुष्कळ होण्यासारखें असतें. पुराणांतरीं वर्णिलेल्या अंबरीष, जनक, धर्म आदिकरून राजर्षींचीं उदाहरणें देऊन त्यांनीं असें सिद्ध केलें कीं, हरिभक्ति व सद्वर्तन साध्य करण्यासाठीं राजानें स्वराज्यत्याग करण्याची गरज नाहीं. हा असा अनेक दृष्टांत देऊन मोठ्या कळवळ्यानें केलेला सद्बोध महाराजांनीं ऐकिला, तेव्हां त्यांची वृत्ति अगदीं तटस्थ होऊन गेली. बावांनीं केलेला एकंदर बोध सत्य असून तदनुसार वागण्यांत वास्तविक हित आहे, असा त्यांच्या बुद्धीचा निर्धार झाला; आणि मग तुकारामबावांच्या व आपल्या मातोश्रींच्या चरणांवर मस्तक ठेवून ते स्वस्थानीं परत गेले; व आपला स्वराज्य-संपादनाचा स्तुत्य क्रम त्यांनीं पुढें चालविला.

## ३६. कष्टेंवीण फळ नाहीं

कष्टेंवीण फळ नाहीं । कष्टेंवीण राज्य नाहीं ॥
केल्यावीण होत नाहीं । साध्य कांहीं ॥ १ ॥
आळसें काम नासतें । हें तों प्रत्ययास येतें ॥
कष्टाकडे चुकावितें । हीन जन ॥ २ ॥
आधीं कष्टाचें दुःख सोसिती । ते पुढें सुखाचें फळ भोगिती ॥
आधीं आळसें सुखाविती । त्यां पुढें दुःख ॥ ३ ॥

इहलोक अथवा परलोक । दोहींकडे सारिखाचि विवेक ॥
दीर्घसूचनेचें कौतुक । कळलें पाहिजे ॥ ४ ॥
मेळविती तितुकें भक्षिती । ते कठीणकाळीं मरोनि जाती ॥
दीर्घसूचनेनें वर्तति । तेचि भले ॥ ५ ॥
इहलोकींचा संचितार्थ । परलोकींचा परमार्थ ॥
संचितेवीण व्यर्थ । जीतचि मेले ॥ ६ ॥
जेंही उदंड कष्ट केले । ते भाग्य भोगून ठेले ॥
येर ते बोलताचि राहिले । करंटे जन ॥ ७ ॥
विचारें इहलोक परलोक । विचारें होतसे सार्थक ॥
विचारें नित्यानित्यविवेक । पाहिला ॥ ८ ॥

## ३७. सज्जनगड

सह्याद्रीच्या मुख्य डोंगराच्या ओळीपासून ज्या पुष्कळ पोटओळी सातारा जिल्ह्यांत पसरल्या आहेत त्यांपैकीं एका विस्कळीत ओळींमधील एका स्वतंत्र सुळक्यावर परळीचा किल्ला बांधलेला आहे. सातारच्या आसपासच्या भागाला सातारचा अजिमतारा व परळीचा नौरसतारा (हीं दोन्ही नांवें औरंगजेबानें दिलेलीं आहेत) हे जयविजयासारखे आहेत. सातारचा अजिम-तारा परळीच्या नौरसताऱ्यापेक्षां उंचीनें, मजबुतीनें व विस्तारानें जरा मोठा आहे. परळीच्या किल्ल्याला दोन वाटा आहेत; एक परळी गांवाच्या अलीकडून उरमोडी नदी ओलांडल्याबरोबर सरळ वर जाते व दुसरी परळी गांवांतून जाते. किल्ल्याच्या दरवाज्या-खालीं दोन्ही रस्ते एके ठिकाणीं मिळतात. किल्ल्याच्या दरवाजाशीं

येईपर्यंत किल्ल्याचा दरवाजा अगदीं दिसत नाहीं. पहिला दरवाजा उत्तम दगडांनीं बांधलेला आहे व त्याचे बाजूस बुरूज असून ते मजबूत आहेत. दरवाजाच्या कमानीवरच पर्शियन भाषेंत लिहिलेला एक शिलालेख आहे.

दरवाजाच्या खालपासून अगदीं दुसऱ्या दरवाजाच्या वरपर्यंत चांगल्या दगडी बांधीव पायऱ्या आहेत. पहिल्या दरवाज्यांतून जरासें वर गेलें म्हणजे हा दुसरा दरवाजा लागतो. हा दरवाजा चांगला मजबूत आहे. याच्या देवडीच्या आंत गेल्यावर उजव्या हाताच्या भिंतींत एक पर्शियन शिलालेख दृष्टीस पडतो. तेथल्या पायऱ्या चढून वर गेलें म्हणजे किल्ल्याच्या सपाटीवरच मनुष्य येतो. येथें जवळच डाव्या हाताला एक लहानशी मुसलमानी कबर लागते व उजव्या हाताला एक लहानसा तलाव लागतो.

हा किल्ला फार मोठा नाहीं, याची रुंदी तर फारच थोडी आहे. तलाव व कबर टाकून जरा पुढें गेलें म्हणजे डाव्या हाताला राहण्याचीं घरें लागतात व उजव्या हाताला पहिल्यापेक्षां मोठा तलाव लागतो. हा तलाव चांगल्या बांधकामाचा असून त्याला तिहींकडून आंत जाण्यास चांगल्या घाटवजा पायऱ्या बांधल्या आहेत.

पुढें गेल्यावर राममंदिराच्या फरशी केलेल्या पटांगणांत आपण शिरतों. थोडेसें चालून गेल्यावर आम्ही राममंदिराच्या सभामंडपाचे पायऱ्यांशीं आलों. सभामंडपाचें काम लाकडी आहे, मात्र खालीं अलीकडील पांढऱ्या काळ्या संगमरवरी विटांची फरशी केलेली आहे. राममंदिर बरेंच जुनें दिसतें. त्याच्या सभोंवार मोठ-

मोठ्या मुसलमानी पद्धतीच्या कमानी असून त्या कमानीवर घुमट केलेला आहे. आंत गाभारा आहे व त्यांत राम, लक्ष्मण, सीता, मारुती व रामदास अशा पांच मूर्ती आहेत. गाभाऱ्याच्या डाव्या बाजूकडून गाभाऱ्याचे खालीं भुयारांत जाण्यास अगदीं काळोखाचा वांकडा जिना आहे. तेथें गाभाऱ्याचे खालीं रामदासस्वामींची समाधि आहे. समाधीच्या पलीकडे भिंतींतील कोनाड्यांत त्यांच्या पितळी पादुका आहेत. हें सर्व पाहून झाल्यावर आम्ही समोरून, पण तळ-घरवजा गाभाऱ्याचे पुढील प्रशस्त दालनांतून, पायऱ्या चढून सभा-मंडपापाशीं आलों.

राममंदिराचें शिखर जुन्याविटांचें असून त्यावर उत्तम गिलावा करून जागोजाग चित्रें काढलेलीं आहेत. एकंदर देऊळ, त्याच्या सभोंवारचें पटांगण व त्याचें शिखर याचें काम फार सुबक आहे; यामुळें हें ठिकाण पाहून मनाला आनंद होतो व रामदासाच्या शिष्यांनीं रामदासासारख्या विख्यात स्वामीला साजेशीच समाधि व मंदिर बांधलें आहे असें वाटल्याखेरीज रहात नाहीं.

समाधियुक्त मंदिर पाहिल्यावर आम्ही देवळाशेजारीं असलेल्या सोपावजा लांकडी इमारतींत गेलों. तेथें देवळाचे पुजारी वगैरे राह-तात. याच घरांत रामदासस्वामी राहत असत असें आम्हांस सांग-ण्यांत आलें. आम्हीं समर्थांची निजावयाची खोली, त्यांचा मच्छर-दाणीसकट पितळी छप्परपलंग पाहिला. स्वामींची गुप्ती असलेली लांब कुबडी, त्यांची उंच वेताची काठी, त्यांची पाण्याची कळशी, तांब्या, भांडें, पळीपंचपात्री वगैरे सर्व जिनसा आम्ही पाहिल्या.

श्रीसमर्थांच्या हयातींतील व त्यांनीं वापरलेल्या जिनसा जितक्या श्रद्धेनें व भक्तिभावानें जतन केल्या आहेत तशा महाराष्ट्रांतील इतर पूर्वकालीन थोर पुरुषांच्या जिनसा ठेवण्यांत आल्या असत्या तर काय बहार झाली असती!

## ३८. सीतागीत

यज्ञासाठीं भूमी । नांगरीता धन्या ।
सांपडली कन्या । सीता देवी. १

जनकाची पुत्री । दुर्जना दुर्मिळा ।
ती भार्या उर्मिळा । लक्ष्मणाची. २

जनकाचा बंधु । होता एकनिष्ठ ।
वयानें कनिष्ठ । श्रेष्ठ गुणें. ३

तेणें भरतासी । मांडवी दुहिता ।
दिली जी सुहिता । दोहीं कुळीं. ४

शत्रुघ्नाला दिली । दुजी श्रुतकीर्ती ।
जीची गाती कीर्ती । पतिव्रता. ५

चवघी बहिणी । भाग्यें झाल्या जावा ।
त्यांचा गीतीं गावा । सुसंवाद. ६

वनवासवृत्त । सीतेसी पुसती ।
प्रेमें त्या सुसती । तिघीजणी. ७

सीता म्हणे ऐका । “ वनवासकथा ।
परी मनीं व्यथा । न धरावी. ८

चित्रकूटाहूनी । पादुका घेऊनी
  वियोग देऊनी । तुम्ही आलां. ९

आम्हीही तेथूनी । तशींच निघालों ।
  वनांत रिघालों । तिघेजणें १०

लक्ष्मण भावोजी । मागें पुढें स्वामी ।
  मज आहें धामीं । ऐसें वाटे. ११

न बाधेचि मज । उष्ण क्षुधा तृषा ।
  तुम्हांपाशीं मृषा । न बोलावे. १२

जेव्हां कांहीं वाटे । चालतां मी मार्गे ।
  मुरडोनि मागें । विलोकिती. १३

बाई काय सांगों । स्वामींची ती दृष्टी ।
  अमृताची वृष्टि । मज होय ! १४

अत्रीच्या आश्रमीं । नेलें मज वाटें ।
  माहेरची वाटे । खरेखुरें. १५

अनसूया सती । करी वेणीफणी ।
  आनंदाची धणी । दिली मज. १६

आजवरी ओली । चंदनाची उटी ।
  आली नाहीं तुटी । माळागुणीं. १७

ऋषीतें वंदित । गेलों गोदातटीं ।
  जेथें पंचवटी । पुण्यस्थान. १८

भावोजींनीं केली । माझी बहु सेवा ।
  ती त्या महादेवा । ठावी असे. १९

तेथें शूर्पणखी । भार्या व्हाया आली ।
तिला माझी ख्याली । चित्तवृत्ती. २०

भावोजींनीं तिचा । कर्णनासाच्छेद ।
केला कीं ते वेद- । शास्त्रार्थज्ञ. २१

तिचा भाऊ खर । होउनीयां क्रुद्ध ।
करावया युद्ध । आला बाई. २२

चवदा सहस्र । राक्षस पापिष्ट ।
रणीं केले पिष्ट । स्वामींनीं ते. २३

तिणें घ्राणरक्तें । मुख मळविलें ।
वृत्त कळविलें । रावणासी. २४

छळाचा उपाय । मनीं आठविला ।
दुष्टें पाठवीला । मायामृग. २५

स्वर्णरत्नमय । मृग म्यां देखीला ।
तो सत्य लेखिला । मनामध्यें २६

गृहा आणावया । मागे हरिणा मी ।
दुःख परिणामीं । नेणोनियां २७

मज रक्षावया । लक्ष्मणा ठेवूनी ।
निघाले घेऊनी । धनुर्बाण, २८

मायामृगामागे । जगदेकशूर ।
गेले बहू दूर । अरण्यांत. २९

कपटी राक्षस । जाणोनिया प्राण ।
घ्यावयासी बाण । मोकलीला. ३०

तो वाण लागतां । हृदयविदारी ।
    दुष्ट हाक मारी । स्वामीवाणी. ३१

‘ हा सीते, हा बंधो । लक्ष्मणा ये धांवे ।
    अंतकाळीं पावे । भेटावया. ’ ३२

मज वाटे माझ्या । स्वामींचीच हाक ।
    शिरे कंप धाक । हृदयांत. ३३

मी म्हणे ‘ भावोजी । धांवा रक्षा प्राण ।
    हे घ्या चापबाण । उठा वेगीं. ’ ३४

भावोजी म्हणती । ‘ राक्षसाची माया ।
    कोण रामराया । पाहों शके ? ’ ३५

वाटलें तें वाक्य । सत्य परी खोटें ।
    झालें दुःख मोठें । माझ्या मनीं ३६

न वदावें तेंची । बोलिलें मी कोपें ।
    चित्त शब्दरोपें । विदारिलें. ३७

वांछितोसी दुष्टा । अग्रजाचा घात ।
    माझ्या अंगा हात । लावावया. ३८

हात लावितांची । सोडीन मी प्राण ।
    शिरीं पादत्राण । कोण वाहे ? ३९

माझ्या दृष्टीपुढें । नको राहों साच ।
    नरकींचा जाच । मूर्त तूंची. ’ ४०

ऐशी बाई माझी । ऐकतांची वाणी ।
    डोळां आले पाणी । भावोजींच्या. ४१

मातेनें दापीतां । वत्स पित्याकडे ।
  जाय तैसें घडे । लक्ष्मणासी. ४२

साधूसी गांजीतां । झालें सध्या फळ ।
  सज्जनाचा छळ । करूं नये. ४३

वाटेंत धनुष्यें । ओढोनिया रेघ ।
  मेले दयामेघ । स्वामींकडे, ४४

तों आला रावण । होवोनी संन्यासी ।
  न कळे अन्यासी । छद्म त्याचें. ४५

भिक्षा द्याया मेलें । रेघेच्या बाहेर ।
  सासर माहेर । बुडवाल्या. ४६

न लंघीतें जरी । धनुष्याची रेखा ।
  तरी त्याचा लेखा । काय होता ? ४७

रेघेच्या बाहेरी । जसा दिला पाय ।
  झाला महाकाय । दशमुख. ४८

जसा हरिणीतें । हरीतो लांडगा ।
  तसा तो दांडगा । हरी मातें. ४९

त्या पाप्याच्या स्पर्शे । देह हा कोमेला ।
  आकाशीं तो मेला । रथीं चढे. ५०

## ३९. जहांगीरचा न्याय

अकबर बादशहाचा पुत्र जहांगीर यास आपल्या इन्साफाचा मोठा अभिमान असे. गरीबगुरीबांची दाद थेट बादशहापर्यंत लागावी म्हणून त्यानें आपल्या महालांत एक घंटा बांधली. तिला दोरी बांधून त्या दोरीचें दुसरें टोंक किल्ल्याचे बाहेर नेऊन एका खांबाला बांधून ठेविलें. खुद्द बादशहाकडे अर्ज द्यावयाचा असला, तर दोरी ओढावी म्हणजे घंटा वाजे, व घंटा वाजली कीं, घंटा वाजविणाराची भेट होऊन त्याला इनसाफ मिळे. एकदा या दोरी बांधलेल्या खांबावर एका पखालीच्या बैलाने आपली मान घासली व त्यामुळें घंटा वाजली. चौकशी करतां खरा मजकूर समजला. तेव्हां दरबारच्या लोकांनीं हात जोडून अर्ज केला "मुकें जनावर आहे, मान घासली, सोडून द्यावें." बादशहा म्हणाला, "नाहीं, त्या बैलावर कांहींतरी जुलूम झाला आहे; पखालींतील पाणी तोला." तें पाणी पांच मण भरलें. तेव्हां बादशहानें हुकूम केला, हें पाणी फार आहे, साडेतीन मणापेक्षां जास्त पाणी पखालींत भरूं नये. भरल्यास शिक्षा होईल.

नूरजहान हिजवर जहांगीरचा जीव कीं प्राण असे. ती मोठी बुद्धिमती व फार शूर असून राज्यकारभारही चालवीत असे. नूरजहानला शिकारीचा फार शोक असे. ती फावल्या वेळीं सकाळ संध्याकाळ निशाण मारण्याची कसरत करी. दिल्लीचा किल्ला यमुनेच्या कांठीं आहे. त्यांत जनानखाना व तिचा महाल यमुनेच्या बाजूलाच होते. एके दिवशीं नदीच्या पैलतीरीं चांद लावून बेगमसाहेब निशाण मारीत

होत्या. एक निशाण चुकून गोळी एका धोब्यास लागून तो मेला. धोबीण आक्रोश करीत करीत किल्ल्याचे दरवाज्यापाशीं आली व तिनें दोरी ओढून घंटा वाजविली. त्याबरोबर पहारेवाल्यांनीं बादशहापुढें नेऊन तिला उभी केली. तिनें हात बांधून अर्ज केला कीं, "आपल्या जनानखान्यांतून गोळी येऊन माझ्या नवऱ्याला लागली व तो मेला" चौकशी करतां असें समजलें कीं, नूरजहानच्या हातून गोळी लागून धोबी मेला. तें ऐकतांच बादशहा फिका पडला. दरबारचे लोक बादशहाच्या तोंडाकडे टक लावून आतां हा काय इन्साफ देतो तें पाहूं लागले. बादशहानें शांतपणानें एक बंदूक, दारू, गोळी व शिलगावलेला तोडा मागविला; आणि धोबिणीच्या समोर बंदूक भरून गोळी घालून, तोडा चढवून तिच्यापुढें केली, व म्हणाला, "आमच्या मुसलमानी न्यायशास्त्राप्रमाणें तुला खुनाच्या बदला खून मिळाला पाहिजे. नूरजहाननें तुझ्या नवऱ्याला मारून तुला विधवा केली. याचेबद्दल तूं तिचा नवरा मारून तिला विधवा कर. ही बंदूक भरून तयार आहे, व तिचा नवराही मी तुझ्यापुढें उभा आहें. चलाव बंदूक!"

हें बादशहाचें भाषण ऐकून दरबारचे सर्व लोक चकित होऊन गेले. धोबिणीनें हात जोडून विनंति केली कीं, मी खून माफ केला. बादशहानें नूरजहानच्या नेमणुकींतून धोबिणीस गांव इनाम दिले. ते गांव अद्यापि तिच्या वंशजाकडे चालत आहेत.

*

## ४७. प्रियकर हिंदिस्तान

प्रियकर हिंदिस्तान
अमुचा प्रियकर हिंदिस्तान
हा अलंकार हो भूगोलाचा । यास नसे उपमान
सर्व सुखाची खाण
अमुच्या सर्व सुखाची खाण
हें अभिमानाचें, सौभाग्यचें अमुच्या रम्य निधान ॥
हे जन्मभूमि, हे तनमनधन घे तुला
तव उपकारांना न मिळे कोठें तुला
हे फिटणें साध्य न आम्हां अति दुर्बला
सुखकर तव घे ध्यान
जो जननीचा, जो जनकाचा तोच तुझाही मान ॥

# ४१. मुलानें न्याय दिला

बगदादचा नामांकित कालीफ हरून् अल्रशीद ह्याच्या कारकीर्दीत त्या शहरांत अली खोजा ह्या नांवाचा कोणीएक व्यापारी रहात असे. तो फार श्रीमंत नव्हता व फार गरीबही नव्हता. त्यानें लग्न वगैरे कांहीं केलेलें नव्हतें, व तो आपल्या वडिलोपार्जित घरांत स्वतंत्रपणें व व्यापारांत नशिबानें जो कांहीं नफा मिळेल त्यांत संतोष मानून रहात असे. अशा प्रकारें सुखांत त्याचा आयुष्यक्रम चालला असतां असें झालें कीं, लागोपाठ तीन रात्रीं एक वृद्ध व पूज्य मनुष्य त्याच्या स्वप्नांत येऊन, त्याला मक्केची यात्रा न केल्याबद्दल फार रागें भरला.

या स्वप्नांमुळें अली खोजा याचें चित्त फार अस्वस्थ झालें. तो धर्मनिष्ठ मुसलमान असल्यामुळें, मक्केची यात्रा करणें आपल्याला आवश्यक आहे हें तो जाणून होता. पण ' आपण पडलों एकटे, आपलें घरदार, दुकान व त्यांतील माल वगैरेची व्यवस्था पाहण्याला दुसरें कोणी नाहीं, यामुळें आपल्याकडून यात्रा करणें घडत नाहीं, त्यास आपला काय उपाय ? ' असें तो मनांत म्हणत असे. तथापि असें म्हणून तो उगीच बसत नसे; तर गरीबगुरीबांस खैरात करून व दुसरीं पुण्यकर्में करून त्या यात्रेचें श्रेय मिळविण्याचा तो यत्न करीत असे. परंतु वर सांगितल्याप्रमाणें एकसारखीं तीन रात्रीं स्वप्नें पडल्यामुळें ती गोष्ट त्याच्या मनाला फार खाऊं लागली, त्याला असें वाटलें कीं, आपण अजूनही स्वस्थ बसलों तर कदाचित् आपल्यावर एखादें संकट गुजरून आपला सर्वस्वीं नाश

होईल. सबब ‘ आतां हें काम लांबणीवर टाकावयाचें नाहीं, ’ असा निश्चय करून त्यानें आपलें दुकान व घरांतील सर्व सामान-सुमान हीं विकून टाकिलीं. व्यापाराच्या शिल्लक असलेल्या मालापैकीं कांहीं मक्केस नेला असतां तेथें तो चांगल्या दरानें जाऊन त्यांत आपल्याला बराच फायदा होईल असें त्यास वाटल्यावरून त्यानें तो थोडासा ठेवून बाकीचा सर्व ओपून टाकिला; व घराला एक भाडेकरी पाहून तेंही त्याच्या ताब्यांत दिलें

याप्रमाणें व्यवस्था केल्यावर, बगदादची इतर यात्रेकरू मंडळी निघतांच त्यांच्याबरोबर निघण्याची त्यानें तयारी केली. वाटखर्चा-करितां वगैरे जो पैसा लागावयाचा तो त्यानें काढून ठेवल्यावर त्याजपाशीं एक हजार मोहोरा शिल्लक राहिल्या. त्या बरोबर बाळगण्याचा त्रास करण्यापेक्षां येथेंच कोठें सुरक्षित स्थळीं ठेवाव्या हें बरें, असें त्यास वाटून त्याप्रमाणें त्या ठेवण्यासाठीं त्यानें पुढील युक्ति योजिली. त्यानें एक डेरा आणिला, आणि त्यांत त्या हजार मोहोरा प्रथम भरून नंतर त्यांवर आलिव नांवाचीं एक प्रकारचीं फळें भरलीं. नंतर त्यानें त्या डेऱ्याचें तोंड बंद केलें, आणि कोणा एका सावकाराशीं त्याचा चांगला स्नेह होता, त्याजकडे तो घेऊन गेला. तो त्या सावकारास म्हणाला, ‘ भाई, मी थोडक्या दिवसांत मक्केच्या यात्रेस जाणार हें तुम्हांला माहीत आहेच. मजजवळ एक आलिवांनीं भरलेला डेरा आहे, तेवढा मी येईपर्यंत तुम्ही आपल्या घरीं ठेवाल तर मजवर तुमचे फार उपकार होतील. ’ सावकारानें उत्तर केलें, ‘ ठीक आहे. ही कोठीची किल्ली घ्या, आणि तुम्हीच आपल्या हातांनीं तो डेरा तिजमध्यें वाटेल त्या ठिकाणीं ठेवून द्या.

तुम्ही परत येईपर्यंत तो जशाचा तसा राहील. त्याला कोणी हातही लावणार नाहीं.

अल्ली खोजा यानें याप्रमाणें त्या हजार मोहोरा आपल्या मतें सुरक्षित स्थळीं ठेवून दिल्यावर, त्याला मागची कसलीहि काळजी राहिली नाहीं. मग यात्रेकरू मंडळी निघाली त्या दिवशीं त्यानें आपलें वाटेचें सर्व सामानसुमान एका उंटावर भरलें, व त्याच उंटावर बसून तो त्यांजबरोबर निघाला. तो मक्केस सुरक्षितपणें पोहोंचला, व महंमदी धर्मांत सांगितलेले संस्कार करण्याकरितां पृथ्वीच्या प्रत्येक भागांतून येणारे हजारों मुसलमान लोक ज्याच्या दर्शनास जातात असें तेथलें काबा या नांवाचें मुसलमानी धर्माचें अत्यंत पवित्र स्थान, त्याचें दर्शन इतर यात्रेकरू मंडळीसहवर्तमान त्यानें घेतलें. नंतर यात्रेसंबंधीं जे काय विधि करावयाचे ते केल्यावर, बरोबर आणिलेला माल विकण्यासाठीं त्यानें तो बाजारांत मांडला.

अल्ली खोजा याचा माल फारच उत्तम व शेलका असल्यामुळें, रस्त्यानें दुसरे दोन व्यापारी चालले होते त्यांची त्याकडे सहज नजर जाऊन तो त्यांच्या मनांत इतका भरला कीं, त्यांना जरी तो खरेदी करावयाचा नव्हता, तरी ते बराच वेळपर्यंत त्याकडे पहात उभे राहिले. नंतर ते आपल्या रस्त्यानें जाऊं लागले असतां त्यांपैकीं एकजण दुसऱ्यास म्हणतो, ‘ या व्यापाऱ्याच्या मालाला येथें जरी चांगला भाव येणार आहे, तरी केरो येथें हा नेला असतां यावर किती किफायत होईल हें जर याला समजलें तर हा खचित येथें न विकतां तो केरो येथें नेऊन विकील. ’

त्या व्यापाऱ्याच्या तोंडचे हे वरील शब्द अली खोजा याच्या कानीं पडले, तेव्हां आपला माल या ठिकाणीं न विकतां केरो येथेंच नेऊन विकावा असें त्याच्या मनांत आलें. खेरीज मिसर-देशांतील मोठमोठ्या नामांकित इमारती व इतर अप्रतिम चिजा ह्यांचें वर्णन त्यानें फार ऐकिलें होतें, यास्तव एकवार तो देश पहावा अशी त्याची इच्छा होती तेव्हां अनायासें एकांत दोन कामें होतील असें समजून त्यानें मिसर देशास जाण्याचा निश्चय केला. मग त्यानें आपला माल फिरून बांधिला, आणि बगदादेस परत न येतां कित्येक व्यापारी मिसरदेशास चालले होते, त्यांज-बरोबर तोही निघाला. केरो येथें पोहोंचल्यावर थोडक्याच दिवसांत त्याचा सर्व माल विकून गेला, व त्यांत त्याला संभव होता त्यापेक्षां पुष्कळच जास्त फायदा झाला. त्या एकंदर पैशाचा त्यानें दुसरा माल खरेदी करून तो दमास्कस येथें नेऊन विकण्याचा बेत केला. दमास्कस येथें जाणारे व्यापारी लोक निघावयास सुमारें दीड महिना अवकाश होता, त्या वेळांत अली खोजा यानें केरो शहरांत जें जें म्हणून पाहण्यासारखें होतें, तें सर्व पाहून घेतलें. खेरीज तिकडचे प्रसिद्ध मनोरे व नीलनदीच्या दोन्हीं कांठचीं कित्येक मोठमोठीं प्रख्यात शहरेंही त्यानें पाहिलीं.

दमास्कस येथें जात असतां मध्यें यरुशलेम शहर लागलें. तेथें व्यापारी मंडळीचा मुक्काम पडला. तेव्हां तेथल्याही पवित्र स्थानाचें दर्शन अली खोजा यास घ्यावयास सांपडलें. मक्का येथील काबा खेरीजकरून मुसलमानी धर्माच्या सर्व पवित्र स्थानांमध्यें वरील

स्थान अत्यंत श्रेष्ठ होय; व त्यावरून यरुशालेम शहराला "पवित्र नगर" हें नांव प्राप्त झालें आहे.

नंतर ही मंडळी दमास्कस येथें जाऊन पोहोंचली. अली खोजा याला तें शहर केवळ नंदनवनच भासलें. त्याच्या सभोंवतालचीं हिरवीचार कुरणें, त्यांमधून वाहणारे स्वच्छ पाण्याचे झरे, मोठमोठे व सुंदर बागबगीचे, इत्यादिकांची अत्यंत रमणीय शोभा पाहून त्याला इतका कांहीं पराकाष्ठेचा आनंद झाला कीं, या स्थळाविषयीं इतिहासांतून जें वर्णन आढळतें, तें कांहींच नाहीं, असें त्यास वाटलें. सारांश, त्या ठिकाणीं त्याचें मन फारच रमलें, पुष्कळ दिवस त्यानें तेथें मुक्काम केला. नंतर तो बगदादेस परत येण्यास निघाला व थोडक्याच दिवसांत अलेप्पो शहरास येऊन पोहोंचला. तेथेंही कांहीं दिवस त्यानें मुक्काम केला. नंतर त्यानें युफ्रेतीस् नदी उतरून मोसल शहराचा रस्ता धरला; व तेथून जवळच्या रस्त्यानें बगदादेस येण्याचा बेत केला.

अलेप्पो शहरापासून मोसल शहरापर्यंत ज्या व्यापाऱ्यांच्या सोबतीनें अली खोजा हा आला होता, त्या व्यापाऱ्यांचा व त्याचा मोठा स्नेह जमला होता. सबब मोसल येथें आल्यावर त्यांनीं त्याला अशी गळ घातली कीं, तुम्ही येथून परभारें बगदाद येथें न जातां शिराज शहरापर्यंत आम्हांबरोबर या, तेथून मग बगदादेस जा. ते व्यापारी बोलून चालून फारच चांगले असून त्यांची वागणूक मोठी सभ्यपणाची होती यामुळें अली खोजा त्यांना फार मान देत असे. तेव्हां त्यांचा शब्द त्याला मोडवेना. खेरीज शिराजपर्यंत गेल्यानें त्याला व्यापारांत नफाही चांगला होण्याचा

संभव होता. अशा दोन्ही कारणांवरून त्या व्यापाऱ्यांबरोबर जाण्याचा त्याचा निश्चय झाला. त्यांनीं त्याला आपल्याबरोबर सुलतानिया, रीं, कोम, काश्चम, इस्पाहन व तेथून शिराज इतक्या शहरीं नेलें. तेथून त्यांजबरोबर तो रमत रमत हिंदुस्तानांतही आला, आणि नंतर फिरून सिराज येथें गेला; आणि तेथून मग ताबडतोब बगदादेस निघून गेला. ह्या एकंदर प्रवासांत त्याचीं सात वर्षें गेलीं.

अल्ली खोजा यानें बगदाद येथें ज्या सावकाराच्या घरी आपला तो आलिवांचा डेरा ठेवून दिला होता, त्याला इतके दिवसपर्यंत अल्ली खोजा ह्याची किंवा त्या डेऱ्याची मुळींच आठवण झाली नाहीं. पण अल्ली खोजा शिराजहून बगदादेस यावयास निघाला त्या सुमारास इकडे असें झालें कीं, तो सावकार एके दिवशीं संध्याकाळीं जेवावयास बसला असतां सहज निघतां निघतां आलि-वांची गोष्ट निघाली. त्यावरून त्याच्या बायकोनें त्याला म्हटलें, " खरेंच, मला आज कितीएक दिवस आलिवें खावीशी वाटताहेत. याकरितां एकदां थोडीं आणाल तर बरें होईल." नवरा म्हणाला, "तं आतां आलीवांची गोष्ट काढलीस त्यावरून, अल्ली खोजा सात वर्षांपूर्वीं मक्केस निघून गेला त्या वेळीं त्यानें आपल्या कोठींत आलिवांचा एक डेरा आणून ठेविला आहे त्यांची मला आठवण झाली. इतक्या दिवसांत अल्ली खोजाचें कांहींच वर्तमान कळलें नाहीं; फक्त, ज्या व्यापारी मंडळीबरोबर तो गेला होता त्यांनीं तो मक्केहून मिसरदेशांत गेला इतकें सांगितलें. तेव्हांपासून आजपर्यंत त्याचा कांहींच पत्ता नाहीं. यावरून तो मरण पावला असावा असें

अनुमान होतें. तर त्यानें ठेविलेलीं तीं आलिवें अजून चांगलीं असली तर तीं आपणांला खाण्यास काय हरकत आहे ? मला एक ताट आणि मेणबत्ती लावून दे पाहूं; मी कोठींत जातों आणि त्यांतून थोडीं घेऊन येतों. तीं कशीं काय लागतात तें आपण पाहूं."

त्या सावकाराच्या बायकोनें आपल्या नवऱ्यास म्हटलें, " अहो असले गैरविश्वासाचें काम करण्यास तुमचें मन घेतें तरि कसें ? ,छीः असें कराल तर तुम्हांला देवाची शपथ आहे ! विश्वासानें एखाद्यानें कांही वस्तु आपल्या स्वाधीन केली असतां तिचा अभिलाष करण्या-सारखें नीच कृत्य कोणतेंही नाहीं, हें तुम्हांला मीं सांगावें असें नाही. तुम्ही म्हणतां कीं, आज सात वर्षे झालीं तरी अली खोजा परत आला नाहीं, यावरून तो मरण पावला असावा. पण तो मिसर देशास गेल्याची तुम्हांला खबर लागली आहे, तसा तो आणखी पुढें कोठे गेला नसेल म्हणून कशावरून ? तो मेल्याची बातमी ज्या अर्थी आपल्याला कळली नाहीं, त्या अर्थी तो कदाचित् उद्यांच येथें येऊन उभा राहील, आणि आपला डेरा मागूं लागेल; नाहीं म्हणून कशावरून सांगावे ? त्याच्या जिनसेची अफरातफर झालेली त्याच्या नजरेस आली तर त्यांत आपणांला किती हलकेपणा येणार आहे बरें ? मी साफ सांगतें, मला त्याचीं तीं आलिवें दृष्टीस नकोत; मी त्यांना शिवणार देखील नाहीं. मी उगीच आपली गोष्ट निघाली म्हणून सहज म्हटलें. शिवाय त्या आलिवांना आज सात वर्षें होऊन गेलीं म्हणून म्हणतां, तेव्हां तीं आतां खाण्यालायक असतील असें तुम्हांला वाटतें ? त्यांना बुरा चढून जाऊन तीं नासून गेलीं असतील. याकरितां त्या डेऱ्याला मुळीं हातच लावूं नये हें बरें."

ती बिचारी बायको इतकें बोलली तरी त्यापासून कांहींएक उपयोग झाला नाहीं. तिच्या नवऱ्याच्या डोक्यांतलें तें वेड म्हणून कसें तें जाईचना. त्यानें बायकोच्या बोलण्याकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. तो तसाच उठला, आणि एक ताट व मेणबत्ती लावून घेऊन कोठींत गेला. तो जाऊं लागला तेव्हां फिरून त्याच्या बायकोनें एकवार त्याला म्हटलें, " तुम्ही हें करतां खरें, पण संभाळा हो! या कामांत माझें अंग मुळींच नाहीं; तेव्हां याबद्दल पुढें कांहीं घोंगडें अंगावर आलें तर त्याबद्दलचा दोष मजकडे नाहीं! "

असो. सावकारानें कोठींत जाऊन डेऱ्याचें तोंड मोकळें केलें, तों आलिवें बुरसून गेलेलीं त्याच्या नजरेस पडलीं. पण तीं तळापर्यंत सगळीं तशींच झालीं आहेत कीं काय हें पाहण्याकरितां त्यानें थोडीशीं ताटांत काढून घेतलीं; आणि बाकीचीं लवकर निघावीं म्हणून डेरा हलवूं लागला, तों कांहीं मोहोरा वर आल्या. हें पाहून त्याला मोठें आश्चर्य वाटलें. मग आणखी किती मोहोरा आंत आहेत हें पाहण्याकरितां त्यानें आंत डोकावलें. तेव्हां त्याला आढळून आलें कीं, आतां आलिवें फारशीं शिल्लक नसून बाकी राहिलेलें बहुतेक सर्व बावनकशी सोनें आहे! मग त्यानें ताटांत काढून घेतलेलीं आलिवें लागलींच परत डेऱ्यांत टाकिलीं, आणि त्याचें तोंड बंद करून परत आपल्या बायकोकडे आला. तो तिला म्हणाला, " अग, तूं म्हटलेंस तें खरेंच. तीं आलिवें सगळीं बुरसून गेलीं आहेत. मीं विनाकारण डेऱ्याचें तोंड उघडण्याची खटपट

ली. असो. पण मीं त्याचें तोंड जसेचें तसें फिरून बंद करून
विलें आहे. तेव्हां आतां अली खोजा जरी परत आला, तरी
रा कोणी उघडला होता असें त्याच्या लक्षांत येणार नाहीं "
याची बायको म्हणाली, " माझें तुम्हीं ऐकिलें असतें तर बरें
ालें नसतें ? आतां ईश्वर करो, आणि आपल्या अंगावर कांहीं
येवो म्हणजे झालें. "

सावकारानें आपल्या बायकोच्या बोलण्याकडे पूर्वीप्रमाणेंच ह्या
ळेसही बिलकुल लक्ष दिलें नाहीं तो मोठा लोभी असे, यामुळें
अली खोजा याच्या द्रव्याचा अभिलाष करण्याचें त्याच्या मनांत
ालें; व अली खोजा कदाचित् परत आलाच, तर त्याला बेमालूम
ीतीनें कसा फसवावा याविषयींचा विचार एकसारखा सर्व रात्र
याच्या मनांत घोळत होता. मग दुसरे दिवशीं सकाळीं उठून तो
ाजारांत गेला, आणि त्याच वर्षाचीं कांहीं आलिवें विकत घेऊन
ाला. नंतर अली खोजानें जीं आलिवें आपल्या डेऱ्यांत भरलीं
ोतीं तीं त्यानें त्यांतून काढून फेंकून दिलीं, आणि त्यांतील
ोहोरा काढून घेऊन आपण आणिलेलीं नवीं आलिवें त्यामध्यें
रलीं आणि पूर्वीप्रमाणें त्याचें तोंड बंद करून तो जेथच्या तेथें
ोता तसा ठेविला.

याप्रमाणें त्या सावकारानें हें अत्यंत नीचपणाचें कृत्य केल्यावर
ुमारें एक महिन्यानें अली खोजा हा परत बगदादेस आला. त्यानें
आपलें घर भाड्यानें दिलेलें असल्यामुळें, तो भाडेकरी दुसरी जागा
ाहून घर खालीं करी तोंपर्यंत तो एका धर्मशाळेंत जाऊन राहिला.

दुसरे दिवशीं अली खोजा हा त्या सावकाराकडे गेला. तेव्हां त्यानें त्याचा मोठा आदरसत्कार करून त्याच्या भेटीमुळें आपल्याला अत्यानंद झाला असें दर्शविलें. तो त्यास म्हणाला, "भाई, तुमचा इतके दिवस कांहींच समाचार न कळल्यामुळें तुमची भेट बहुतेक आतां दुर्लभच असें आम्हांला वाटूं लागलें होतें. पण बरें झालें, तुम्ही आपले सुखरूप येऊन आम्हांला भेटला."

याप्रमाणें त्यांचे कुशल प्रश्न वगैरे झाल्यावर अली खोजा यानें सावकारापाशीं आलिवांचा डेरा मागितला व तो आजपर्यंत संभाळण्याची तुम्हीं तसदी घेतली हे मजवर फार उपकार झाले, असें त्यास म्हटलें. सावकार त्यास म्हणाला, "भाई, यांत उपकार ते कसले? तुमचा डेरा आमचे येथें राहिल्यानें आम्हांला त्याचें ओझें सोसावें लागलें कीं काय? मी तुमच्या ठिकाणीं असतों तर तुम्हींही मजकरितां एवढें केलें असतें. घ्या ही कोठीची किल्ली. तुमचा डेरा जेथें तुम्हीं ठेविला होता तेथें तो तसाच आहे. आपला घेऊन जा."

अली खोजा कोठींत गेला, आणि डेरा तेथून घेऊन आला. त्यानें कोठीची किल्ली सावकाराच्या स्वाधीन केली, आणि त्यास सलाम करून तो परत धर्मशाळेंत आपल्या बिऱ्हाडीं आला. नंतर त्यानें डेऱ्याचें झांकण काढिलें, आणि जितक्या खोल मोहोरा ठेविल्या होत्या, तितका त्या डेऱ्यांत त्यानें हात घातला. परंतु हाताला त्या लागेनात. हें पाहून मनांत चपापला; पण फिरून त्याला वाटलें कीं, कदाचित् आपला आजमास चुकला असेल. मग ताबडतोब ह्या

मोटींचा उलगडा करण्याकरितां त्यानें आपल्या बरोबरचीं ताटें, थाळे, वगैरे काढून त्यांत त्या डेऱ्यांतलीं सर्व आलिवें ओतलीं, आणि डेरा पालथा केला. तों खरोखरच एकही मोहोर त्यांत नाहीं. हें पाहून तो पराकाष्ठेचा आश्चर्यचकित होऊन गेला, आणि हात व डोळे वर आकाशाकडे करून म्हणाला, "ज्याला मी आपला परम मित्र असें समजतों, त्याच्या हातून असें अधमपणाचें कृत्य घडूं शकेल काय ?"

अली खोजा ह्याला एकाएकीं आपलें एवढें मोठें नुकसान झालेलें पाहून फार दुःख झालें. तो त्या सावकाराकडे परत आला, आणि त्यास म्हणाला, " भाई, मी गेलों न गेलों तोंच परत आलों याचें तुम्हांला आश्चर्य वाटूं देऊं नका. मी कबूल करतों कीं, मीं जो तुमच्या कोठींतून आलिवांचा डेरा नेला तो माझाच आहे पण त्या आलिवांत मीं हजार मोहोरा ठेविल्या होत्या त्या मला सांपडल्या नाहींत कदाचित् तुम्हांला त्यांची गरज लागून तुम्हीं त्या खर्च केल्या असल्यास कांहीं चिंता नाहीं त्या माझ्या येथें असल्या काय आणि तुमच्या येथें असल्या काय एकच परंतु त्या सुरक्षित असल्या म्हणजे झालें. तर आतां माझी तुम्हांस इतकीच विनंति आहे कीं, काय वास्तविक प्रकार असेल तो मला सांगून माझें मन स्वस्थ करा, आणि माझ्या रकमेबद्दल मला पावती द्या. मग तुम्हांला सवड सांपडेल तेव्हां माझी भरपाई करा; त्याबद्दल माझें कांहीं एक म्हणणें नाहीं." अली खोजा हा लागलींच परत येईल हें त्या सावकाराला ठाऊकच होतें, यास्तव त्यानें त्याला जें काय उत्तर द्यावयाचें तें अगोदरच योजून ठेविलें होतें. तो अली खोजा

ह्यास म्हणाला, " दोस्त अली खोजा, तुम्हीच सांगा बरें, ज्या वेळेस आलिवांचा डेरा तुम्हीं मजकडे आणिला, त्या वेळेस मीं त्याला हात तरी लाविला काय ? तुमच्या हातीं मीं कोठीची किल्ली दिली कीं नाहीं ? आणि तुम्ही स्वतः तो जेथें नेऊन ठेविला तेथच्या तेथें तो होता तसाच बंद केलेला तुम्हांला आढळला कीं नाहीं ? तेव्हां तुम्हीं त्यांत मोहोरा ठेविल्या असल्या तर तुम्हांला त्या सांपडल्या पाहिजेत. तुम्हीं मला सांगितलें की, त्यांत आलिवें आहेत व मलाही तें खरें वाटलें. यापेक्षां जास्त मला या प्रकरणाची कांहीं एक माहिती नाहीं. तुम्ही माझें बोलणें खरें माना अगर नका मानूं, पण मी तुह्मांला सांगतों कीं, मी कांहीं तुमच्या डेऱ्याला हात लाविला नाहीं."

बऱ्या बोलानें हा मनुष्य बधेल तर पहावें, म्हणून अली खोजा यानें आपला होता तेवढा प्रयत्न केला. तो त्या सावकारास म्हणाला, ' भाई, मी वास्तविक सांगतों कीं, मला तंट्याबखेड्याचा मनापासून कंटाळा आहे; याकरितां हें प्रकरण तुम्ही निकराला पोहोंचविण्यास मला भाग न पाडाल तर फार चांगलें होईल. त्यांत तुमची अप्रतिष्ठा होईल व मला वाईट वाटेल, याशिवाय दुसरें कांहीं नाहीं. आपण व्यापारी लोकांनीं, कितीही नुकसान झालें तरी तें सोसून अब्रूचें जेणेंकरून संरक्षण होईल असें वर्तन केलें पाहिजे हें तुम्हांस सांगायाला पाहिजे असें नाहीं. असो, तर मी शेवटची एकच गोष्ट तुम्हांला सांगतों कीं, तुम्ही आपलाच हेका धरून बसाल तर निरुपायास्तव मला तुमच्यावर फिर्याद करण्याची पाळी येणार आहे. पण फिरून आणखी तुम्हांला मी सांगतों कीं, तसें करणें केवळ माझ्या जिवावर

येईल. कारण, आपलें थोडें नुकसान झालेलें पुरवलें, पण सरकार-दरबार करणें होईल तितकें टाळावें, अशी माझी नेहमीं मनापासून इच्छा असते."

सावकारानें उत्तर केलें, "हें पहा, तुम्हीं मजपाशीं आलिवांचा डेरा आणून ठेविला, ही गोष्ट निर्विवाद आहे. बरें तुम्हींच आपला तो पाहून घेतला, आणि बिन्हाडीं नेला हेंही तुम्ही कबूल करतां. असें असतां आतां तुम्ही मजपाशीं हजार मोहोरा मागतां तेव्हां हें मजवर तुम्ही निवळ बालंट घेतां हें पाहिजे तो सांगेल. तुम्हीं डेऱ्यात मोहोरा ठेविल्या हें मला सांगितलें होतें तरी ? त्यांत आलिवें होतीं हें देखील तुम्हीं मला सांगितलें म्हणून मला माहीत. तम्हीं मला तीं दाखविलीं होतीं थोडींच. असो. एकंदरीनें तुम्हीं मला हजार मोहोरांचा गंडा घालूं पाहातां, आं ? शाबास अली खोजा, बरेच उपकार फेडलेत ! त्या डेऱ्यांत तुम्ही आणखी हिरे व मोत्यें ठेविलीं होतीं म्हणून नाहीं म्हणाला ! भल्या गृहस्था, आतां उगीच हुजत घेत बसूं नको. मुकाट्यानें चालता हो. रिकामा येथें बाजार भरविण्याचें काम नाहीं."

त्या दोघांचें वरील बोलणें चाललें असतां तेथें आधींच पुष्कळ लोक जमले होते, व तो सावकार शेवटीं जेव्हां हुमरीतुमरीवर आला तेव्हां तर तेथें लोकांची खूपच गर्दी जमली. त्यांत कित्येक त्या पेठेंतले व्यापारीही आले होते. त्यांनीं त्या दोघांच्या तंट्याचें कारण समजून घेऊन तो मिटविण्याचा प्रयत्न चालविला. त्यांनीं अली खोजा याचा सर्व वांका ऐकून घेतल्यावर त्याच्या प्रतिपक्ष्यास, 'तुमचें यावर काय म्हणणें आहे तें कळूं द्या,' असें म्हटलें

त्यानें उत्तर केलें, " अली याचा डेरा मीं आपल्या कोठींत ठेविला होता हें मी कबूल करतों. पण मी शपथ वाहून सांगतों कीं, मीं त्याला हात देखील लाविला नाहीं. त्यांत आलिवें आहेत असें त्यानें मला सांगितलें तेवढेंच काय तें मला माहीत आहे; याहून कांहीं नाहीं. असें असून हा मनुष्य विनाकारण मजवर तुफान घेत आहे, व माझ्या घरांत येऊन माझी अप्रतिष्ठा करीत आहे, हें तुम्ही सर्व पहात आहां, व याबद्दल तुम्हांला साक्ष द्यावी लागेल. "

हें भाषण ऐकून अली खोजा फारच संतापला, आणि त्या सावकाराच्या दंडाला हात घालून तो म्हणाला, " तुमची अप्रतिष्ठा मी करीत नाहीं; तुम्हींच ती आपल्या हातानें करून घेत आहां; व ज्या अर्थी तुम्हीं असें निंद्य आचरण केलें आहे, त्या अर्थी तुम्हांला न्यायासनापुढें उभें करून शपथ घ्यावयास लावणें मला भाग आहे. पाहूं तर आतां काजीच्या समोरही तुम्हांला अशीच निवळ लबाडी सांगण्याचा धीर होतो कीं काय तो. "

अली खोजा याचें हें भाषण ऐकून तो सावकार निरुत्तर झाला. कारण जो खरा मुसलमान आहे, त्याजवर कांहीं वाईट काम केल्याचा आरोप आला असून जर तो ' मीं तें केलें नाहीं ' असें म्हणत असेल, तर त्याला ' शपथेवर तूं असें सांग ' असें म्हटलें असतां त्यानें तें ऐकिलें पाहिजे. नाहीं तर त्याला नास्तिक म्हणतील. तेव्हां याप्रमाणें त्या सावकाराला दुसरी तोडच न राहिल्यामुळें तो अली खोजा यास म्हणाला, " ठीक आहे. माझ्याही मनांत तेंच होतें. पाहूं आतां कोण खरा आणि कोण खोटा ठरतो तो. "

अली खोजानें त्या सावकारास काजीपुढें म्हणजे न्यायाधीशापुढें नेलें, आणि ‘ या मनुष्यानें विश्वासघात करून माझ्या हजार मोहोरा घेतल्या, ’ अशी त्यानें त्याजपुढें फिर्याद केली. काजीनें त्यास विचारिलें, “ तुझे कांहीं साक्षीदार आहेत काय ? ” त्यानें उत्तर केलें, “ मीं इतकी खबरदारी घेतली नाहीं; कारण मला वाटलें कीं, हा आपला मित्र आहे, तेव्हां याच्या हातून लबाडी कदापि होणार नाहीं. ”

सावकारानें पूर्वीं त्या व्यापाऱ्यासमोर जें काय आपल्या तर्फेनें सांगितलें होतें, तेंच या वेळींही सांगितलें. तो म्हणाला, “ मी शपथेवर सांगतों कीं, मीं याच्या मोहोरा मुळींच घेतल्या नाहींत; एवढेंच नव्हे, पण मजपाशीं त्या ठेविल्या होत्या हें देखील मला माहीत नाहीं. ” त्यावरून काजीनें त्यांजकडून रीतीप्रमाणें शपथ घेवविली, आणि त्यास दोषमुक्त म्हणून सोडून दिलें.

काजीनें याप्रमाणें न्याय केल्यामुळें आपल्याला विनाकारण एवढी मोठी ठोकर सोसावी लागणार, हें पाहून अली खोजा ह्यास फारच वाईट वाटलें त्यानें काजीस असें स्पष्ट बोलून दाखविलें कीं, “ हा न्याय बरोबर झाला नाहीं. मी आतां कालिफाकडे अर्ज करतों; तेथें माझा न्याय बरोबर होईल. ” काजीला वाटलें कीं, “ हा कसला कालिफाकडे अर्ज करतो, याचा पक्ष खोटा ठरल्याकारणानें याला संताप आला आहे, यामुळें हा असा बोलत आहे. आणि कालिफाकडे अर्ज केला तर करीना खुशाल. आपल्यास त्याची डर कशाला पाहिजे ? आपल्याला जें वास्तविक

दिसलें तें आपण केलें. उगीच साक्षीपुरावा असल्यावांचून एखाद्याला शिक्षा द्यावयाची कीं काय ?''

आपली सरशी झाली व आपल्याला आयतीच एवढी मोठी रक्कम पचली याबद्दल अली खोजा याच्या प्रतिपक्ष्यास मोठा आनंद होऊन तो निघून गेला. इकडे अली खोजा घरीं गेला, व त्यानें एक अर्ज तयार केला; आणि दुसरे दिवशीं कालीफ हा दुपारचा नमाज पढून परत जात असतां त्यानें त्याला रस्त्यांत गांठिलें, व अर्ज घेणारा कामगार त्याच्यापुढें चाललेला होता, त्याच्या हातांत त्यानें आपला अर्ज दिला.

कालीफ हा नमाज पढून राजवाड्यांत परत आल्यावर त्याज-पुढें अर्जाची सुनावणी होत असते असें अली खोजा यास माहीत होतें. त्यावरून तो दरबारांत गेला, आणि सुनावणी करणारा कामगार कालीफाच्या महालांतून अर्जाची सुनावणी करून येई-पर्यंत तेथें थांबला. तो कामावर आल्यावर त्यानें अली खोजा ह्यास दुसरे दिवशीं कोणत्या वेळीं हजर व्हावयाचें तें सांगून, प्रति-वादीसही त्या वेळेस हजर असण्याविषयीं हुकूम पाठविण्याकरितां त्याचा ठावठिकाणा विचारून घेतला.

कालीफ हरून् अलूरशीद हा, आपला मुख्य वजीर जाफर व जनानखान्यांतील मुख्य खोजा मश्रूर यांस बरोबर घेऊन शहराचा बंदोबस्त यथास्थित आहे कीं नाहीं हें पक्केपणीं समजण्याकरितां कित्येक वेळां वेष पालटून टेहेळणी करीत फिरत असे. या त्याच्या संप्रदायाप्रमाणें वरील दिवशीं संध्याकाळीं तो फिरावयास निघाला

असतां रस्त्यांत कांहीं गलबला त्यास ऐकूं आला. त्यावरून, तें काय आहे हें समजून घेण्याकरितां तो गलबला ऐकूं आला त्या घरापाशीं तो गेला. त्या घराचा दरवाजा लावलेला होता. त्याच्या फटींतून त्यानें पाहिलें तों आंतील अंगणांत दहा बारा मुलें जमून कांहीं खेळ खेळण्याच्या बेतांत आहेत असें त्याच्या दृष्टीस पडलें.

हीं मुले कसला खेळ खेळतात हें पहावें अशी कालिफास इच्छा झाली. यास्तव दरवाज्याजवळच एक बांक पडलेलें होतें त्यावर तो बसला, आणि फटींतून खेळ पाहूं लागला. त्या मुलांपैकीं जो अतिशय चलाख व हुषार मुलगा होता, तो म्हणाला, "चला," आपण काजीची नक्कल करूं. हा मी काजी झालों. आतां अल्ली खोजा व ज्यानें त्याला हजार मोहरांना फसविलें तो सावकार, हे दोघे येऊं द्या माझ्यासमोर."

हे वरील शब्द ऐकून कालीफाला अल्ली खोजाच्या अर्जाची आठवण झाली, व त्यामुळें त्या मुलांच्या खेळाकडे त्याचें जास्त लक्ष लागलें

अल्ली खोजा व सावकार ह्यांच्यांतील तंटा शहरांत इतका महशूर झालेला होता कीं, मुलाबाळांच्या तोंडीं देखील जिकडे तिकडे त्याचीच चर्चा चाललेली असे. यास्तव त्या संबंधाचा खेळ खेळण्याची योजना सर्व मुलांस पसंत पडून प्रत्येकानें कोण-कोणतें सोंग घ्यावयाचें त्याचा त्यांनीं ठराव केला. पूर्वीं सांगित-लेल्या मुलानें काजीचें काम पतकरलें, त्याबद्दल कोणींही आपली नाखुषी दर्शविली नाहीं. नंतर काजीची ऐट आणून तो आपल्या जाग्यावर बसला, व जो मुलगा चोपदार झाला होता, त्यानें वादी

व प्रतिवादी यांस त्याच्यासमोर आणून उभें केलें. याप्रमाणें त्या खटल्याची नक्कल सुरू झाली.

काजी अली खोजास म्हणाला, "या सावकारावर तुझी काय फिर्याद आहे?"

अली खोजा यानें काजीस लवून सलाम केला, आणि आपली सर्व हकीकत त्यास निवेदन करून शेवटीं तो म्हणाला, "हें सर्व ध्यानीं आणून माझें जें विनाकारण एवढें मोठें नुकसान होत आहे तें न होईल असा या प्रकरणाचा निकाल करणार काजी-साहेब समर्थ आहेत"

नंतर काजी सावकाराकडे वळून त्यास म्हणाला, "अली खोजा याचा पैसा तूं कां परत देत नाहींस?" यावर खऱ्या सावकारानें शहरच्या काजीसमोर जें कांहीं सांगितलें होतें तेंच ह्यानेंही सांगितलें, आणि आपल्या म्हणण्याच्या खरेपणाबद्दल शपथ वाहण्यास तो तयार झाला.

काजी म्हणाला, "थांब अंमळ; मला तो आलिवांचा डेरा अगोदर पाहिला पाहिजे." नंतर तो वादीकडे वळून म्हणाला, "तूं तो डेरा आणिला आहेस काय?" त्यानें उत्तर केलें, "नाहीं." काजी म्हणाला, "जा तर, ताबडतोब तो घेऊन ये."

अली खोजा यानें बाहेर जाऊन आल्यासारखें करून, एक डेरा काजीपुढें ठेविला, आणि आपण प्रतिवादीपाशीं जो ठेविला होता व त्यानें जो परत दिला तो हाच, असें त्यानें म्हटलें. काजीनें "हाच काय तो डेरा?" असें सावकारास विचारलें.

त्यानें नाहीं म्हटलें नाहीं. यावरून ती गोष्ट त्यानें कबूल केली असें दिसलें त्यावरून काजीनें तो डेरा उघडण्याविषयीं हुकूम केला. तेव्हां अल्ली खोजानें त्याचें झांकण काढलें. काजीनें त्यांत पाहिलेंसें करून म्हटलें, " हीं आलिवें फार चांगलीं दिसताहेत. त्यांची रुचि कशी काय आहे तेवढी पाहिली पाहिजे. " असें म्हणून तो त्यांतून एक आलिव घेऊन तें चाखलेसें करून म्हणाला, " हीं तर फारच उत्कृष्ट आहेत. वाहवा ! सात वर्षांचीं आलिवें इतकीं चांगलीं असणें ही मोठी विलक्षण गोष्ट दिसते ! एक दोघे आलिवांचा व्यापार करणारे इसम बोलवा पाहूं. अशा गोष्टीच्या संबंधानें त्यांचें मत घेणें रास्त आहे " काजीच्या तोंडांतून हे शब्द निघतांच दोन मुलगे व्यापारी म्हणून त्याच्यापुढें येऊन उभे राहिले. त्यांस काजीनें सवाल केला, " तुम्ही आलिवांचा व्यापार करतां ? " त्यांनीं म्हटलें, " होय, सरकार. " काजी त्यांस म्हणाला, " तर आलिवें किती वर्षेंपर्यंत चांगलीं रहातात ते सांगा पाहूं ? " व्यापाऱ्यानीं उत्तर केलें, " तीं किती जरी जपून ठेविलीं, तरी दोन वर्षांवर चांगलीं रहात नाहींत. तीन वर्षांनंतर तर त्यांची चवही जाते व रंगही जातो. " काजीनें फिरून सवाल केला, " बरें तर, ह्या डेऱ्यांतलीं आलिवें किती वर्षांचीं असावीं तें सांगाल ? "

त्यावरून व्यापाऱ्यांनीं डेऱ्यांत डोकावून त्यांतलीं एक दोन आलिवें चाखलींसें केलें, आणि ते म्हणाले, " हीं नवीं असून फार चांगलीं आहेत. " काजी म्हणाला, " तुम्हांला बरोबर परीक्षा झाली

नाही. अली खोजा म्हणतो कीं, मीं हीं आलिवें सात वर्षांपूर्वी डेऱ्यांत ठेवलेलीं आहेत, आणि तुम्ही म्हणतां तीं नवीं आहेत, हें कसें ? "

व्यापाऱ्यांनीं उत्तर केलें, " सरकार, आम्ही खातरीनें सांगतों कीं, तीं यंदाचीच आहेत; याविषयीं आपण यत्किंचितूही शंका मनांत आणूं नये. हें आम्हीच म्हणतों असें नाहीं, तर ह्या बगदाद शहरांत आज शेंकडों व्यापारी आहेत, त्यांपैकीं पाहिजे त्याला आपण विचारलें असतां तो असेंच सांगेल, याविषयीं आमची पक्की खातरी आहे. "

आरोपी सावकार ह्या व्यापाऱ्यांच्या विरुद्ध कांहीं बोलणार होता, पण काजीनें त्यास बोलूं दिलें नाहीं. तो म्हणाला, " चूप रहा, एक शब्दही बोलूं नको तूं दगलबाजी केलीस याविषयीं बिलकुल संशय नाहीं. तुला याबद्दल फांशी दिलें पाहिजे. " हें ऐकून सर्व मुलांनीं मोठ्या आनंदानें टाळ्या पिटल्या, व आरोपीस फांशीं चढविण्याकरितां त्यास पकडून घेऊन जाऊं लागले. एवढें झाल्यावर त्यांनीं आपला खेळ संपविला.

काजी झालेल्या मुलाचें शहाणपण व न्याय करण्याचें चातुर्य पाहून कालीफ हरून् अलूरशीद याला किती आश्चर्य वाटलें हें सांगतां पुरवत नाहीं. तो आपल्या जाग्यावरून उठला, आणि जाफर वजीरही एवढा वेळपर्यंत चाललेलें सर्व ऐकत होता त्यास तो म्हणाला, " या खेळाविषयीं तुम्हांला कसें काय वाटतें? " जाफर यानें उत्तर केलें, " राजाधिराज, खरोखर इतक्या लहान

वयाच्या मुलांच्या अंगीं एवढें शहाणपण पाहून मला पराकाष्ठेचें नवल वाटतें. ''

कालीफ म्हणाला, '' पण ह्याच खटल्याचा निकाल उद्यां मजपुढें व्हावयाचा आहे हें तुम्हांला माहीत आहे काय ? ख-या अल्ली खोजानें आजच मजकडे अर्ज आणून गुजरला आहे; तर या प्रकरणांत ह्याहून जास्त योग्य न्याय करितां येईल असें तुम्हांला वाटतें ? '' वजिरानें उत्तर केलें, '' राजाधिराज, या मुलाच्या तोंडून जशी गोष्ट आपण ऐकिली तशीच जर ती वास्तविक घडली असेल, तर या प्रकरणाचा याहून जास्त योग्य न्याय कोणत्याही प्रकारें करतां येणार नाहीं असें मला वाटतें. '' कालीफ म्हणाला, '' तर मग ह्या घराची खूण लक्षांत ठेवा, कां कीं, ह्या खटल्याचा निकाल त्या मुलाकडूनच उद्यां मी आपल्या समक्ष करविणार आहें. याकरितां त्याला घेऊन जाण्याकरितां तुम्हांला येथें आलें पाहिजे. तसेंच, त्या दगलबाज सावकारला ज्या काजीनें दोषमुक्त म्हणून सोडून दिलें, त्यालाही येण्याविषयीं हुकूम करा, म्हणजे हा मुलगा न्याय कसा करतो तो पाहून तरी त्याला आपलें काम योग्य रीतीनें बजाविण्याची अक्कल येईल. त्याचप्रमाणें, अल्ली खोजा याला आपला आलिवांचा डेरा आपल्याबरोबर घेऊन येण्याविषयीं कळवून, आलिवांचा व्यापार करणाऱ्या दोन आसामींनाही हजर रहाण्याविषयीं हुकूम करा.

याप्रमाणें वजिरास हुकूम करून कालीफ तेथून चालता झाला. त्याला त्या दिवशीं लक्षांत ठेवण्यासारखी दुसरी कोणतीही गोष्ट आढळली नाहीं.

दुसरे दिवशीं ज्या घरीं वर सांगितलेला मुलांचा खेळ चालला होता, तेथें जाफर वजीर गेला, आणि 'या घराचा मालक कोण ?' म्हणून त्यानें चौकशी केली. परंतु तो घरीं नसल्यामुळें त्याची बायको बाहेर आली. तिला वजिरानें विचारलें, "बाई तुम्हांला कांहीं मुलगे आहेत काय ?" तिनें उत्तर केलें, "तिघे आहेत." असें म्हणून तिनें त्या मुलांस त्याच्यापुढें आणून उभें केलें. वजिरानें त्यांस विचारलें, "मुलांनो, काल तुम्ही खेळत होतां त्या वेळेस काजी कोण झाला होता ?" तेव्हां सर्वांत वडील होता त्यानें "मी झालों होतों" असें म्हटलें. पण असें विचारण्याचें कारण काय हें त्याला माहीत नसल्यामुळें, त्याला भय पडून त्यानें तोंड गोरेंमोरें केलें. वजीर त्यास म्हणाला, "मुला, चल मजबरोबर; कालीफ महाराजांनीं तुला बोलाविलें आहे"

वजीर मुलाला बरोबर घेऊन जातो असें पाहून त्याच्या आईला मोठी धास्ती पडली; आणि "कालीफ महाराजांनीं याला कशाकरितां बोलाविलें आहे ?" म्हणून तिनें वजीराला विचारलें. वजीर तिला म्हणाला, "बाई तुम्ही कांहीं भिऊं नका. तुमचा मुलगा आतां दोन घटकांच्या आंत परत येईल; व कालीफ महाराजांनीं त्याला कशाकरितां बोलाविलें आहे तें तोच तुम्हांला सांगेल. तें ऐकून तुम्हांला मोठा हर्ष वाटेल." मुलाची आईची म्हणाली, "असें आहे काय, तर मग त्याला चांगला पोषाख घालूं द्या. कारण कालीफ महाराजांसमोर अशा मळकट कपड्यांनिशीं जाणें बरोबर नाहीं." वजिरानें म्हटलें, "ठीक आहे घाला पोषाख."

मग त्या बाईनें त्या मुलाला चांगला पोषाख घातल्यावर वजीर त्यास बरोबर घेऊन गेला. आणि अली खोजाचा खटला निघण्याचे वेळीं त्यानें त्याला कालिफासमोर उभें केले.

कालिफापुढें जातांच मुलगा जरा घाबरला. तेव्हां त्याला धैर्य येण्याकरितां कालीफ म्हणाला, " मुला, असा इकडे ये. अली खोजा व ज्यानें त्याला हजार मोहोरांना फसविलें तो सावकार ह्या उभयतांमधील तंटा काल ज्यानें निवाडिला, तो तूंच ना? त्या वेळीं तुला मीं पाहिलें, व तुझें सर्व बोलणें ऐकिलें. तेणेंकरून मला मोठा संतोष झाला. " मुलानें नम्रतेनें उत्तर केलें, " राजाधिराज, होय मींच तो. " कालीफ म्हणाला, " बरें तर, ये माझ्या शेजारीं बैस. खरा अली खोजा व तो सावकार हे आतां तुझ्या दृष्टीस पडतील. "

नंतर कालिफानें त्या मुलाचा हात धरून त्याला आपल्या शेजारीं सिंहासनावर बसविलें, आणि वादीप्रतिवादींस पुकारण्याविषयीं हुकूम केला त्यांना पुकारतांच ते आले, व त्यांनीं कालिफास साष्टांग नमस्कार घातला. ते उठून उभे राहिल्यावर त्यांना कालीफ म्हणाला, " तुम्हांला आपल्या तर्फेनें जें काय बोलाववयाचें असेल तें बोला. हा मुलगा तुमचा सर्व वांका ऐकून घेईल, व तुमचा न्याय निवडील. त्यांजकडून कांहीं चूक झाल्यास मी सुधारून घेईन. "

कालिफाचा हुकूम होतांच वादी व प्रतिवादी हे अनुक्रमें आपा-

ण्ल्यातर्फेनें जें बोलावयाचें तें बोलले. पण तो सावकार जेव्हां शपथ घेऊं लागला, तेव्हां मुलगा त्यास म्हणाला, "थांब अंमळ, तो आलेवांचा डेरा प्रथम आम्हांला पाहिला पाहिजे."

हें ऐकतांच अल्ली खोजा यानें आलिवांचा डेरा कालिफापुढे ठेविला, आणि त्याचें झांकण काढिलें. कालिफानें तीं आलिवें नीट लक्षपूर्वक पाहिलीं, आणि त्यांतून एक घेऊन तें चाखिलें. नंतर आदले दिवशीं हजर राहण्यास सांगितलेल्या दोघां व्यापाऱ्यांना बोलाविलें, व त्यांना त्यांची परीक्षा करण्यास त्यानें सांगितलें. त्यांनीं सांगितलें कीं, 'हीं फार चांगलीं असून याच वर्षाचीं आहेत.' त्या मुलानें त्यास म्हटलें, "अल्ली खोजानें हीं सात वर्षांपूर्वीं या डेऱ्यांत ठेविलीं आणि तुम्ही म्हणतां हीं यंदाचीं आहेत. हें कसें!" तेव्हां खेळांत त्या व्यापाऱ्यांनीं जसे उत्तर दिलें होतें तसेंच त्यांनीही दिलें.

सावकाराला जरी स्पष्ट दिसून आलें कीं, या व्यापाऱ्यांच्या साक्षीवरून आपणावर गुन्हा पक्का शाबीद झाला, तरी आपल्या तर्फेनें थोडेंबहुत बोलण्याचा त्यानें प्रयत्न केला; पण त्या मुलानें त्याला फांशीची शिक्षा न सांगतां कालिफाकडे वळून म्हटलें, "राजाधिराज, मी काल खेळांत फांशीची शिक्षा दिली खरी पण याला शिक्षा द्यावयाची ती देण्याचा अधिकार आपला आहे."

सावकाराच्या लबाडीविषयीं कालिफाची पक्की खात्री झाली होती, सबब त्यानें त्यास कोतवालाच्या हवालीं केलें.

त्यानें अली खोजाचा पैसा कोठें ठेविला होता तें कबूल केलें व तो त्याचा त्यास परत मिळाला. कालिफानें काजीस ' योग्य न्याय कसा करावा हें त्या मुलापासून शीक, ' असें सांगून त्या मुलाला प्रेमानें आलिंगिलें, आणि त्याला शंभर मोहोरांची एक थैली बक्षीस देऊन घरीं जाण्यास परवानगी दिली.

# लेखक परिचय

## भास्कर दामोदर पाळंदे ( १८३२-१८७४ )

वाईजवळील मेणवली या गावीं या कवीचा जन्म झाला. याचें शिक्षण ठाणें व मुंबईस झालें. पुढें त्यांनीं सरकारी नोकरी पत्करली व आपल्या अगच्या गुणानें चढत चढत ते 'स्मॉल कॉज कोर्टा' तील न्यायाधीश झाले 'रत्नमाला' नावाचा एक सर्वोत्कृष्ट ईशभक्तिपर पद्यग्रन्थ यानीं लिहिला आहे. याची सर्व कविता भाक्तिपर आहे. याचीं कित्येक पदें प्रेमळ असून भाषा गोड व सरळ आहे.

## करमणूक

हें साप्ताहिक पत्र प्रसिद्ध कादबरीकार हरि नारायण आपटे हे लिहीत असत. त्यानी आपल्या बऱ्याच कादंबऱ्या या पत्रांतून प्रथम प्रसिद्ध केल्या. करमणूक, ज्ञान व उपदेश याचें योग्य समिश्रण या पत्रात असल्याकारणानें तें आबालवृद्धास प्रिय असे हें साप्ताहिक पत्र इ. स १८९० पासून १९१७ पर्यंत प्रसिद्ध होत असें.

## माधवानुज ( १८७२-१९१७ ).

याचे मूळ नाव काशिनाथ हरि मोडक. धंदा डॉक्टरीचा पण वाङ्मयाकडे स्वाभाविक कल असल्यामुळे इंग्रजी कवींच्या कृतीचा उत्तम परिचय याना झाला होता. रवीन्द्रनाथ टागोर याच्या गीताजलीचें यानीं केलेले भाषातर आतापर्यंत झालेल्या सर्व प्रयत्नांत सरस आहे. काव्यरचना करतांना जुन्या वृत्ताप्रमाणेंच नवीन चालीचाहि यानी स्वीकार केला आहे. नित्याच्या जीवनातील मनोरम प्रसगाची निवड करून त्यावर काव्य करण्याकडे माधवानुजाची प्रवृत्ति असे. करुणरस याच्या काव्यात प्रमुखत्वाने आढळतो.

## विठ्ठल दत्तात्रय घाटे ( १८९६ )

प्रसिद्ध कवि दत्त याचे हे चिरंजीव. हे एम्. ए., बी. टी , टी. डी. असून यानीं शिक्षणशास्त्राचा चागला अभ्यास केला आहे. सध्यां ते एज्युकेशनल इन्स्पेक्टरच्या हुद्यावर आहेत. यांनीं काहीं थोड्या कविता लिहिल्या असून 'मधुमाधव,' 'शलाका' या काव्यसंग्रहांतून त्या प्रसिद्ध झाल्या आहेत. 'नाट्यरूप महाराष्ट्र' या पुस्तकांत शिवकालीन इतिहास संवादरूपानें सागितला आहे. थोडीच परंतु भावपूर्ण कविता यांनीं लिहिली आहे.

## गिरीश ( १८९३ )

श्री. शकर केशव कानेटकर हे आपली कविता ' गिरीश ' या टोपण नावानें प्रसिद्ध करतात. याचे मूळ गाव सातारा जिल्ह्यातील रहिमतपूर. हे एम् ए. असून ' अभागी कमल, ' ' कला, ' ' आम्बराई ' हीं खडकाव्ये यानीं लिहिलीं आहेत. याच्या स्फुट गीताचा संग्रह ' काञ्चनगङ्गा ' या नावानें प्रसिद्ध झाला आहे. गिरीशाना कुणबाऊ भाषा चागली साधते. त्याचा सामाजिक विषयाकडे कल असून स्त्रियाचीं गाऱ्हाणीं त्यानी आपल्या काव्यातून जनतेपुढें माडलीं आहेत. रचना रेखीव असून भाषा प्रसादपूर्ण आहे. अपरिचित शब्द किंवा कर्णकटु शब्दप्रयोग सहसा आढळत नाहीत. त्याचीं काही भावगीतें गेय असल्यामुळें बरींच लोकप्रिय झालीं आहेत

## विनायक कोंडदेव ओक ( १८४०–१९१५ )

जुन्या पिढींतील एक लेखक सर्व नोकरी शाळाखात्यात झाली. ' बालबोध ' नावाचें मासिक ते सतत ३४ वर्षे चालवीत होते या मासिकातील सर्व मजकूर ओकाच्या स्वतःच्या लेखणीतून उतरलेला असे त्याखेरीज यानीं लहानमोठीं सुमारे ५० पुस्तके लिहिलीं आहेत बहुतेक पुस्तके इंग्रजी भाषेतील ग्रंथाच्या आधारे लिहिली आहेत नवीन व स्वतत्र विचार सागण्यापेक्षा सर्वमान्य विचार सामान्य जनतेला कळतील अशा सुबोधरीतीनें सागण्याकडे त्याचा कल होता.

## कृष्ण केशव

याचेसबंधाने काहीच माहिती उपलब्ध नाहीं. याची भूपाळी मात्र प्रसिद्ध आहे.

## गोविंद सखाराम सरदेसाई ( १८६५ )

हे मुंबई विश्वविद्यालयाचे बी. ए. असून बडोदें संस्थानात निरनिराळ्या हुद्याचीं कामे यानी केली आहेत गेली ४० वर्षे यानी इतिहासाच्या अभ्यासाला वाहून घेतलें आहे. मोठ्या प्रमाणावर हिंदुस्थानचा सकलित इतिहास लिहिण्याचे काम यानी केले असून हा इतिहास ' रियासती ' या नावानें प्रसिद्ध आहे. पेशवे दप्तरातील निवडक कागदपत्राचे सुमारें ४०।४५ भाग सरकारच्या परवानगीनें व सहाय्यानें प्रसिद्ध करीत आहेत उपलब्ध साधनाचा परिश्रमपूर्वक अभ्यास करावयाचा व ती माहिती वाचकापुढें व्यवस्थित प्रकारें माडावयाची हें काम काहीं सोपें नाही. त्याच्या कामगिरीबद्दल ' रावसाहेब ' ही पदवी देऊन सरकारनें त्याना गौरविलें आहे.

## सुधारक

हें पत्र प्रसिद्ध समाजसुधारक गोपाळ गणेश आगरकर यांनीं चालविलें होतें. भाषा जोरदार, व निर्भीड असून विषयाची माडणी तर्कशुद्ध असल्याकारणाने समाज-सुधारणेसारख्या अप्रिय विषयावर चर्चा करणारें हें पत्रही लोकप्रिय झालें होतें. महाराष्ट्रांत गेल्या पंचवीस वर्षांत दिसून येणाऱ्या विचारक्रांतीचे पुष्कळसें श्रेय आगरकराच्या 'सुधारकाला' आहे.

## दु. आ. तिवारी ( १८८७ )

हे कवि खानदेशाकडील आहेत. याचा व्यासंग दाडगा आहे. ऐतिहासिक प्रसंगावर वीररसपरिप्लुत अशी रचना करण्याकडे या कवींचा विशेष ओढा आहे. आधुनिक मराठी वाङ्मयामध्यें राष्ट्रीय व ऐतिहासिक कविता लिहिण्याची विनायकांनीं जी प्रथा पाडली तिचा पुरस्कार श्री तिवारी यानीं केला आहे. ' मराठ्याचीं संग्रामगीतें ' या त्यांच्या काव्यसंग्रहात त्यांची ऐतिहासिक कविता संकलित केली आहे.

## इतिहाससंग्रह व भारतवर्ष

प्रसिद्ध इतिहाससंशोधक रावबहादूर पारसनीस यानीं ऐतिहासिक कागदपत्राचें प्रकाशन करण्याकरिता ' भारतवर्ष ' हें मासिक १८९६ सालीं सुरूं केलें. याचे एकंदर २४ अंक निघून पुढें तें बंद पडले. जुनीं ऐतिहासिक कागदपत्रे प्रसिद्ध करणें व अनुषंगिक ऐतिहासिक विषयाची चर्चा करणें हा हेतु हें मासिक सुरूं करताना डोळ्या-पुढें होता. बखरी, कैफियती, ऐतिहासिक पत्रे व यादी इत्यादि बरीच ऐतिहासिक सामुग्री भारतवर्षातून प्रथमच प्रकाशित झाली.

या मासिकाच्या द्वारां थोडीबहुत ऐतिहासिक सामुग्री रावबहादूर पारसनीस यानीं प्रकाशित केली. तीखेरीज कितीतरी जुने ऐतिहासिक महत्त्वाचे लेख व पत्रें शिल्लक होतीं. त्यांच्या प्रकाशनाची व्यवस्था होण्याकरितां ' इतिहाससंग्रह ' हें मासिक १९०८ सालीं सुरू झालें. हें एकंदर सात वर्षे चाललें. ऐतिहासिक पुरुषाचीं चरित्रें, ऐतिहासिक स्थळांची माहिती, इतिहासविषयक चित्रें, इत्यादि अनेक विषयाचा अन्तर्भाव झाल्या-मुळें हें मासिक बरेंच लोकप्रिय झालें होतें.

## किशोर ( १८९१ )

श्री. माधव केशव काटदरे यांचा जन्म कोल्हापूर संस्थानांतील विशाळगड-कर पंतप्रतिनिधींच्या मलकापूर या गांवीं झाला. मुलांना उपयुक्त असे यांचे

लघुनिबंध, गोष्टी व कविता ही ' खेळगडी, ' नामक मासिकांतून प्रसिद्ध होत असतात. मराठ्याच्या इतिहासातील प्रसंगावर नवीन पद्धतीच्या कविता लिहावयास प्रथम यानीच सुरुवात केली. त्या कवितापैकीं शिवकालीन रायगड, शाहूचें दक्षिणेंत आगमन, कान्होजी आंग्रे याचा पोवाडा, पानपतचा सूड व गोकलखां या कविता लोकप्रिय आहेत हल्ली यानी इसवी सनाच्या चवथ्या व पाचव्या शतकांत होऊन गेलेल्या सम्राट् गुप्ताच्या घराण्याविषयीं चर्चात्मक व संशोधनात्मक लेख लिहिण्याचे कार्य हातीं घेतले आहे.

**महादेव रामचंद्र परांजपे ( १८८२ )**

फर्ग्युसन कॉलेजमध्ये रसायनशास्त्राचे प्रोफेसर होते. तेथून सुटल्यानतर मुबईस एका शाळेचे हेडमास्तर म्हणून काम केलें. सध्या नूतन मराठी विद्यालयात शिक्षक असून ' प्रोग्रेस आफ् एज्युकेशन ' नावाचें एक शिक्षणविषयक इंग्रजी मासिक सहकाऱ्याचे मदतीनें चालवितात. याचे बहुतेक लेखन इंग्रजी व तेही त्रोटक वर्तमानपत्रीं लेखाच्या स्वरूपाचे शिक्षणविषयक प्रश्नाचा यानीं चागला अभ्यास केला आहे. ' अरेबियन नाईट्स ' या प्रसिद्ध इंग्रजी पुस्तकातील ' सिंदबादच्या सफरी ' नावाचें एक प्रकरण यानी मराठीत पुस्तकरूपानें लिहिले आहे. त्यातूनच ' हिऱ्याच्या दरींतील रात्र ' हा उतारा घेतला आहे

**तुकाराम ( १६०८–१६४९ )**

प्राचीन संतकवींपैकीं साधुवर्य तुकाराम हे प्रमुख होत. पुण्यापासून १८ मैलावर देहू नावाचें गाव आहे तेथील हे रहिवासी, आणि तेथेच वाण्याचा धंदा हे करीत. तुकाराम महाराज सदेह वैकुंठाला गेले अशी भाविक भक्ताची समजूत आहे. ज्ञानेश्वरानंतर महाराष्ट्रात भक्तिप्रधान वारकरी संप्रदाय बराच फोफावला. तुकाराम महाराज स्वत. वारकरी पंथाचे असल्यामुळें अज्ञजनात त्याचा प्रसार करण्याचें कार्य त्यानीं केलें. त्यानीं सुमारें ५००० अभंग रचिले आहेत. त्याची अभंगवाणी सहजस्फूर्त आहे. रचनेच्या ठाकठिकीकडे त्याचें फारसे लक्ष नसे, पण अंतरींचा उमाळा अभंगांत प्रतिबिंबित झाल्यामुळे त्याच्या भाषेंत जिवंतपणा ओतप्रोत भरला आहे. व्यवहारातील दाखले देऊन नीतिपर तत्त्वें अभंगात गोंवण्याची कला तुकारामांना चागली साधली होती. त्याच्या अभंगातील पुष्कळ चरण मराठीमध्यें म्हणीवजा होऊन बसले आहेत.

**केशवसुत ( १८६६–१९०५ )**

यांचें सबंध नांव कृष्णाजी केशव दामले. त्याचें शिक्षण पुणें येथील न्यू इंग्लिश स्कूल मध्यें प्रवेशपरीक्षापर्यंत झालें. त्यानंतर त्यांचें सर्व आयुष्य खानदेशात शाळामास्तरची

नोकरी करण्यात गेलें. १९०५ साली हुबळी येथें प्लेगनें ते वारले. अर्वाचीन मराठी काव्याला नवीन जोमदार व स्वतंत्र वळण लावणाऱ्या कवींमध्यें केशवसुतांना अग्रस्थान द्यावे लागेल. १८८५ ते १९०५ पर्यंतच्या वीस वर्षांच्या काळात त्यानीं सुमारें १५० भावगीतें लिहिली यापैकीं थोडीं भाषांतरात्मक असून बाकी सर्व स्वतंत्र आहेत. त्याच्या कवितेत नादमाधुर्य कमी असले तरी ओजस्विता व स्फूर्तिदायकता हे गुण भरपूर आहेत नव्या कल्पना व जोरकस भाषा यामुळें केशवसुताच्या कवितेंत जिवंतपणा वाटतो व त्यातील भावनाची उत्कटता वाचकाच्या हृदयाला जाऊन भिडते.

## गोविंद चिमणाजी भाटे ( १८७१ )

डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सभासद व विलिंग्डन कॉलेज, सांगली, या संस्थेचे माजी प्रिन्सिपाल हे कर्ते सुधारक म्हणून प्रसिद्ध आहेत हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागात यानी प्रवास केला असून तत्संबंधीं लेख व पुस्तके वेळोवेळीं लिहिलीं आहेत. १९२९ सालीं हे विलायतेलाहि गेले होते आणि विलायतच्या प्रवासाची वर्णनपर विस्तृत लेखमाला त्यानी 'मनोरंजना'तून प्रसिद्ध केली आहे. मराठीमध्यें प्रवासवर्णनपर विपुल वाङ्मय यांच्याइतकें दुसरें कोणीं लिहिले नाही याखेरीज 'प्रेम की लौकिक,' 'अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें,' 'सौंदर्य व ललितकला,' 'कँट व शंकराचार्य,' 'स्कॉटचे चरित्र' इत्यादि विविध प्रकारची पुस्तके यानी लिहिलीं आहेत. याचें अवलोकन सूक्ष्म असून वर्णनपद्धति मोहक असते. भाषा सजविण्याकडे याचे विशेष लक्ष नाहीं. सुंदर शब्दापेक्षा अर्थवाहक शब्द उपयोगात आणल्यामुळें याची भाषाशैली स्वाभाविक वाटते.

## गोविंद रावजी चोळकर ( १८९३ )

हे बी. ए., बी. टी. असून सध्या इचलकरंजी येथील गोविंदराव हायस्कूलचे हेडमास्तर आहेत. त्यानी मुलाकरिता काही निबंध लिहिले असून लौकरच पुस्तकरूपानें ते प्रसिद्ध होणार आहेत.

## वासुदेव गोविंद मायदेव ( १८९४ )

हे मुंबई विश्वविद्यालयाचे एम. ए. असून प्रो. धों. के. कर्वे याच्या महिलाविद्यालयात अध्यापक आहेत काही किरकोळ लेख त्यानीं लिहिले असून 'गरिबांची गोष्ट,' 'अभिनयगीत' आणि 'भावतरंग' अशीं कवितांचीं पुस्तके त्यांनीं प्रसिद्ध

केलीं आहेत. नित्याच्या जीवनातील साधेसुधे प्रसंग घेऊन त्यावर रचिलेलीं त्यांचीं कवनें हृदयंगम व बालमनाचें यथार्थ आविष्करण करणारीं अशीं उतरलीं आहेत. कल्पनेच्या उत्तुंग भराऱ्या किंवा नवविचाराचा प्रवाह नसला तरी हें साधें स्वरूपच आल्हाददायक वाटतें. याच्या कांहीं विनोदी कविताहि आहेत.

## गणेश रघुनाथ अभ्यंकर ( १८७३ )

हे सांगली येथें वकील आहेत. संस्थानी राजकारणाचा यानीं फार चांगला अभ्यास केला असून तत्संबंधीं वेळोवेळीं इंग्रजी आणि मराठीमधून त्यानीं लिहिलेले लेख प्रसिद्ध आहेत. पुणें येथील लॉ-कॉलेजात ते प्रोफेसराचेंहि काम करीत असतात. संस्थानी राजकारणाखेरीज इतर विषयावरहि त्यानीं थोडेफार लिहिलें आहे.

## हरि नारायण आपटे ( १८६४-१९१९ )

मराठीतील आद्य कादंबरीकार म्हणून हरिभाऊंचे नाव विश्रुत आहे. कॉलेज-मध्यें असल्यापासूनच त्याच्या वाङ्मयसेवेला सुरुवात झाली आणि परीक्षेच्या अभ्यासापेक्षा इतर वाचनाकडे त्याचा विशेष ओढा असल्यामुळे कॉलेजचें शिक्षण अर्धेंच राहिलें. हरिभाऊनी सामाजिक व ऐतिहासिक मिळून २०।२१ कादंबऱ्या लिहिल्या. त्याखेरीज स्वतःच काढलेल्या ‘ करमणूक ’ नावाच्या साप्ताहिकात किती तरी लहान मोठ्या गोष्टी त्यानीं लिहिल्या आहेत.

हरिभाऊंच्या कादंबऱ्यानी मराठी भाषेत क्रांति घडवून आणली. निबंधमालेनें मराठी भाषेचे ओज जसे सर्वांच्या प्रत्ययास आणिलें तसेंच इंग्लिशमधील कादंब-ऱ्याच्या तोडीच्या कादबऱ्या मराठींत लिहिणें कसें शक्य आहे हें हरिभाऊंनीं दाखविलें. मराठी वाङ्मयाचा दर्जा वाढण्यास त्याच्या कादंबऱ्या बऱ्याच अंशाने कारणीभूत झाल्या. टिळक-आगरकरानीं वर्तमानपत्राच्या द्वारा लोकजागृति केली. हरिभाऊंनीं ललित वाङ्मयाच्या साहाय्यानें नवीन कालाला अनुरूप अशीं देशहिताचीं अनेक ध्येयें समाजापुढें माडलीं, समाजांतील दुष्ट चालीरीती वेशीवर टांगल्या व समाजाला सर्वांगीण उन्नतीचा मार्ग दाखविला. मराठी भाषेचे साधें, शुद्ध परंतु रमणीय स्वरूप हरिभाऊंच्या वाङ्मयकृतींत पाहावयास सापडेल. पुष्कळ नवीन शब्दाची भर त्यानी घातली, तसेंच खासगी बोलींतील कित्येक शब्दांना वाङ्मयाच्या क्षेत्रांत पावन करून घेतलें.

**कुंत** ( १८७५–१८९९ )

दत्तात्रय कोंडो घाटे हें यांचें सबंध नांव. त्यांचें शिक्षण अहमदनगरास झालें. नोकरीनिमित्त ते बडोद्यास गेले व तेथेंच प्लेगला बळी पडले. त्यांनी निसर्गवर्णनपर व देशभक्तिपर काव्यें लिहिलीं असलीं तरी त्यांचें वैशिष्ट्य शिशुगीतात आहे. त्यांची कविता सुबोध व करुण आहे. भाषा नादमधुर आहे. ते आणखी काहीं वर्षे जगले असते तर या उत्कृष्ट गुणाचा परिपाक झालेला दृष्टीस पडला असता.

**राजाराम परशुराम सबनीस** ( १८९३ )

शिक्षण प्रसारक मंडळी, पुणें, या संस्थेचे हे आजीव सेवक असून सर परशुरामभाऊ कॉलेजात अर्थशास्त्र, गणित, इतिहास हे विषय ते शिकवितात. महाराष्ट्राचा इतिहास व संस्कृति याबद्दल यांना विशेष अभिमान वाटतो यांनीं फार लिहिलेलें नाहीं, परतु जे लिहिले आहे तेंच विचारपूर्वक लिहिलें असल्यामुळें त्याला एक प्रकारचें महत्त्व आहे. स्वाभिमान व परगुणग्रहण या इष्ट प्रवृत्तींचे मिश्रण याचे ठायीं दिसून येतें. ' जगाचें वाङ्मय ' या नावाचीं दोन पुस्तके यांनीं प्रसिद्ध केलीं असून त्यामध्यें निरनिराळ्या देशांतील लेखकांचे उत्कृष्ट उतारे संग्रहित केले आहेत.

**श्रीपाद कृष्ण कोल्हटकर** ( १८७१ )

प्रतिभावंत नाटककार, मार्मिक टीकाकार व विनोदी लेखक म्हणून हे प्रसिद्ध आहेत. यांनीं काहीं लघुकथा व दोन कादंबऱ्याहि लिहिल्या आहेत. विनोदी लेख लिहिण्याची नवीन प्रथा त्यानीं पाडली. याच्या विनोदी लेखात सामाजिक व्यंगांवर प्रच्छन्न हल्ला चढविलेला आहे, परंतु विनोदामुळें तो तितकासा झोंबत नाहीं. हे कट्टे सुधारणावादी आहेत. यांच्या बहुतेक लिखाणातून सामाजिक किंवा धार्मिक सुधारणाचा पुरस्कार केलेला आढळतो. याच्या लिखाणात कधीं सुदर कल्पनांनीं नटलेली, तर कधीं साधी व सहज, कधीं विद्वत्ताप्रचुर तर प्रसंगीं रुक्ष सुद्धा, अशा रीतीनें विषयानुरूप भाषा लिहिलेली आढळून येते.

**मोरोपंत** ( १७२९–१७९४ )

या कवीचें सबंध नाव मोरेश्वर रामचंद्र पराडकर. यांचें लहानपण कोल्हापुरानजीक पन्हाळगडास गेलें. पाध्ये नांवाच्या गुरूपाशीं मोरोपंत संस्कृत शिकले. यांच्या वडिलांनीं बारामती येथील सुप्रसिद्ध सावकार बाबूजी नाईक याजकडे नोकरी धरली; तेव्हा मोरोपंतही बारामतीस आले आणि यांची योग्यता लक्ष्यांत घेऊन बाबूजी

नाईकानीं याना आश्रय दिला. पंताची बहुतेक सर्व काव्यरचना बारामतीस झाली. याचे मुख्य काव्यग्रंथ म्हटले म्हणजे आर्याभारत, एकशें आठ रामायणें, मन्त्रभागवत, हरिवंश वगैरे होत. स्फुट प्रकरणेंहि यानीं पुष्कळच लिहिलीं आहेत.

पंताच्याइतकी विपुल कविता फारच थोड्या कवीनीं केली आहे. बहुतेक काव्यें आर्यावृत्तात असल्यामुळे याना आर्यापति असे कौतुकाने लोक म्हणत. याची भाषा व्याकरणशुद्ध व विविध प्रकारच्या शब्दार्थालंकारानी युक्त अशी आहे. संस्कृत शब्दाचा विशेष भरणा असल्यामुळे याची कविता प्राय. दुर्बोध आहे परंतु मराठी भाषेला समृद्ध करून तिचे वैभव वाढविणारामध्यें पंताची प्रमुखत्वाने गणना केली पाहिजे यात शंका नाहीं.

## दत्तात्रय बळवंत पारसनीस ( १८७१–१९२६ )

हे इतिहाससंशोधक म्हणून प्रसिद्ध होते ' भारतवर्ष ' व ' इतिहाससंग्रह ' या मासिकाच्या द्वारा बरेच जुने कागदपत्र यानीं प्रकाशित केले आहेत पेशवे दप्तरांतील काही कागदपत्र प्रसिद्ध करण्याची परवानगी सरकारनें याना दिली होती. ' झाशीच्या लक्ष्मीबाईचें चरित्र,' ' ब्रह्मेंद्रस्वामी चरित्र व पत्रव्यवहार, ' ' दिल्ली अथवा इन्द्रप्रस्थ, ' ' मराठ्याचे पराक्रम ' वगैरे इतिहासविषयक आठ दहा पुस्तके यानीं लिहिली आहेत ऐतिहासिक कागदपत्रें व जुनी दुर्मिळ चित्रे याचा यानीं सातारा येथें जमविलेला संग्रह मूल्यवान् आहे जुन्या ऐतिहासिक कागदपत्राचे संकलन करणें व त्यापैकी बरेंच यथावसर प्रसिद्ध करणे ही याची मुख्य कामगिरी. ऐतिहासिक रूक्ष माहिती मनोरंजक रीतीनें आकर्षक भाषेंत सागण्याची त्याची हातोटी वर्णनीय आहे

## नारायण वामन टिळक ( १८६४–१९१९ )

टिळक मूळचे नासिकचे राहाणारे. ख्रिश्चन धर्माची तत्त्वें पटल्यामुळे यानीं तो धर्म स्वीकारला. प्रसाद हा याच्या कावितेचा विशेष आहे. मुलें आणि फुलें यासंबधीं मनोरम काव्यें यानी केलीं असल्यामुळें याना ' मुलाफुलाचे कवि ' असे म्हणतात शृंगार किंवा वीर या रसापेक्षा करुण, वत्सल, व शांत या रसांकडे कवीचा विशेष ओढा. याची ' अभंगाञ्जलि ' भक्तिरसपूर्ण आहे. रचना करताना त्यानीं नव्याप्रमाणे जुन्या वृत्तांचाहि स्वीकार केला आहे. याची भाषा साधी, सरळ व गोड आहे. सोप्या शब्दात तत्त्वज्ञानप्रचुर विचार मांडण्याचें चांगलेच कौशल्य या कवीमध्यें दिसून येतें.

**मनोरंजन**

इंग्रजींत गोष्टी, प्रवासवृत्तें, निबंध, कविता, वगैरे प्रसिद्ध करणारी मासिके अनेक आहेत. त्या धर्तीचें हें मराठींतील पहिलेंच मासिक कै. काशिनाथ रघुनाथ मित्र यांनीं सुरू केले व त्याच्या निधनानंतर त्याचे संपादन त्याच्या कन्या कु मालतीबाई मित्र या करतात. कालानुक्रमानेंच नव्हे तर योग्यतेनेंही हें मासिक अजून पहिलें आहे असें म्हणण्यास हरकत नाही. पुष्कळ होतकरू लेखकाना या मासिकाने प्रसिद्धी दिली व वाचकाचे अभिरुचीला योग्य वळण लावले 'रामाचा सेतु' हा लेख सदर मासिकात १९१५ सालीं प्रसिद्ध झाला होता

**श्रीधर ( १६७८-१७२९ )**

याचे मूळ गाव नाझरें याना आपल्या वडिलाकडून गुरूपदेश मिळाला. लहानपणापासून विरक्तवृत्ति असल्यामुळे यानी आपलें सर्व आयुष्य पंढरपूर येथें पाडुरंगचरणीं घालविले 'रामविजय,' 'पाडवप्रताप,' 'हरिविजय,' 'शिवलीलामृत' वगैरे ग्रंथ यानी लिहिले आहेत ओवीसारखे धावतें वृत्त व आबालवृद्धाना समजेल अशी सोपी भाषा या दोन गुणामुळें श्रीधराचे ग्रंथ अधिक लोकाच्या वाचनात येतात कोणताहि प्रसग असो, त्याचे चटकदार वर्णन करण्याचा श्रीधराचा हातखंडा आहे विषयाबरोबर तादात्म्य पावून कवीला नादमधुर व समर्पक शब्द आपोआप सुचतात उपमा, उत्प्रेक्षा इत्यादि अलंकाराचा यथोचित उपयोग करून श्रीधर मनोवेधक भाषा लिहूं शकतात

**गोविंद अनंत मोडक ( १८८८ )**

'मुलाचा महाराष्ट्र' या लोकप्रिय पुस्तकाचे कर्ते 'लहान मुलाचा महाराष्ट्र,' 'लहान मुलाचा हिंदुस्थान', 'इंग्लंडचा सोपा इतिहास' व 'इंग्लंडचा इतिहास' हीं इतिहासविषयक शालोपयोगी पुस्तके यानीं लिहिलीं आहेत

**नारायण केशव बेहेरे ( १८९० )**

याचे सर्व शिक्षण नागपूर येथें झाले व मध्यप्रात व वऱ्हाड प्राताच्या शिक्षणखात्यात नोकरी झाली याची वाङ्मयसेवा विपुल आणि विविध आहे गोष्टी, कादंबऱ्या, चरित्रें व ऐतिहासिक प्रबंध यांनी लिहिले असून याच्या कविता व स्फुट लेख शेकडों आहेत. याचें सर्वच लिखाण आवेशयुक्त असतें केवळ कलाविलासाकरिता लिहिलेलें वाङ्मय निर्जीव अतएव त्याज्य; खरें वाङ्मय संदेशवाहक असलें पाहिजे अशी याची वाङ्मयासंबंधीं कल्पना आहे

## आनंद कृष्णाजी टेकाडे ( १८८८ )

हे कवि नागपूर प्रातातील आहेत. याना कविता करण्याचा अगदी लहानपणापासूनच नाद आहे. याची स्फुट कविता ' आनंदगीत ' भाग १, २ व ३ यामध्यें संकलित केली आहे. गेयानुकूल चाली हुडकून त्यामध्यें काहीं गीतें यानी रचिलीं असल्यामुळे तीं अत्यंत लोकप्रिय झालीं आहेत. ' हा हिंद देश माझा ' हें याचें राष्ट्रगीत तर आबालवृद्धाच्या परिचयाचे झालें आहे. याची भाषा साधी व जोरदार असते.

## कृष्णराव अर्जुन केळूसकर ( १८७० )

हे जातीनें मराठे आहेत. यानी श्रीछत्रपति शिवाजी महाराज याचें विस्तृत चरित्र मराठींत लिहिलें आहे. ' गौतम बुद्ध, ' ' तुकाराम ' इत्यादि चरित्रें व ' उपनिषदें ' ' गीता ' याची भाषातरें यानीं प्रसिद्ध केली आहेत

## रामदास ( १६०८–१६८२ )

निजामच्या राज्यात गोदावरीच्या काठीं जाब नावाचें गाव आहे तेथें रामदास स्वामींचा जन्म झाला रामदासाचे पहिलें नाव नारायण असे होतें इच्छेविरुद्ध आईनें लग्न ठरविलें म्हणून हे ऐनवेळी पळाले आणि नाशिक जवळील पंचवटींत राहून त्यानी तपश्चर्या केली पुढें रामाची ते उपासना करूं लागले म्हणून त्याचे नाव रामदास असे पडले. रामदास हे आजन्म ब्रह्मचारी राहिले व महाराष्ट्रात धर्मजागृति करण्याकरिता ' रामदासी पंथ ' नावाचा स्वतंत्र पंथ त्यानीं काढून, ठिकठिकाणी मठस्थापना केली स्वराज्यसंस्थापक छत्रपति शिवाजी महाराज हे रामदासाचे शिष्य होते आणि रामदासाच्या सागण्यावरून भगवा झेंडा हें मराठ्याचें राष्ट्रीय निशाण झाले.

रामदास हे साताऱ्याजवळील परळी किल्ल्यात रहात असत त्यालाच लोक सज्जनगड म्हणूं लागले. ' दासबोध, ' ' मनाचे श्लोक, ' ' स्फुट ओव्या, ' 'करुणाष्टकें ' इत्यादि ग्रंथ त्यानी रचिले आहेत. त्यापैकी ' दासबोध ' हा त्याचा महत्त्वाचा ग्रंथ असून रामदासाच्या शिकवणीचें सार त्यामध्यें आलें आहे. प्रपंच आणि परमार्थ याची योग्य सागड कशी घालावी याचा बहुमोल उपदेश दासबोधात आला आहे, माघ वद्य ९ शके १६०३ या वर्षीं रामदास स्वामींनीं सज्जनगडावर समाधि घेतली

---

# अर्थबोधक टीपा

## ईशस्तवन

ईश–परमेश्वर स्तवन-स्तुति जगत्पाळ–जगाचें पालन करणारा. नित्यसौख्य–कायमचे सुख, मोक्ष पद्म–कमळ वासना-इच्छा. भृंग–भुंगे. अंग.. निकामीं–बालपणात माझें शरीर दुर्बल होतें. मानें–मानानें, प्रमाणानें. उद्यम–उद्योग घटणें–कमी होणें इष्ट–इच्छित वस्तु. प्रार्थिजे–प्रार्थना करावी.

शशी–चंद्र. अज–ज्याला जन्म नाहीं असा, अर्थात् परमेश्वर.
भवाब्धि–( भव+अब्धि ) संसाररूपी समुद्र. भंगभीति–फुटण्याची भीति.

## विद्येची भूपाळी

भूपाळी–प्रातःकाळीं म्हणावयाचीं पदें प्रभात–सकाळ. वासरमणी–सूर्य. पावन–पवित्र मानसमलहरणीं–मनाचें अज्ञान दूर करण्यामध्यें. सरी–बरोबरी. अज्ञानोद्धरणी–अज्ञान काढून टाकण्याच्या कामीं

## मावळयाचें गाणें

हें गाणें कुणबाऊ भाषेंत लिहिलें आहे.

भावू–भाऊ दुस्मन्–शत्रू सामिन्दर–समुद्र नौकची–नावेची, आरमाराची. मायबोलीचा थोर–ज्याच्या कारकीर्दीत मायबोलीची ( मराठी भाषेची ) थोरवी वाढली. पवाडा–पराक्रमी पुरुषाच्या वर्णनाचें गाणें रावू–राजा. बाणा–अभिमान. बारामावळ–मावळप्रांताचे बारा भाग आहेत म्हणून त्याला बारामावळ म्हणत.

( १ ) वरील कवितेंत ‘ तोरण ’ बद्दल ‘ तोरन ’, ‘ समुद्र ’ बद्दल ‘ सामिन्दर ’ बहिणी ’ बद्दल ‘ भनी ’, असे कुणबाऊ शब्द कवीनें वापरले आहेत.

( २ ) पहिलीं दोन कडवीं आपण जी भाषा बोलतो तीमध्यें लिहून काढा.

## उठि गोपालजी

गोपालजी–कृष्ण. सौंगडे–सवंगडी; सोबती. निशी–रात्र. मानसीं–मनामध्यें. ध्याती–ध्यान करतात. उदयाचळीं–उदय पर्वतावर, पूर्वेकडे उदयाचल आणि पश्चिमेकडे अस्ताचल असे दोन पर्वत आहेत अशी पौराणिक कल्पना.

पुंजाळलें–एकत्र झालें, साचलें. बाहती–हाक मारतात. यादवा–कृष्णा.
रमा–लक्ष्मी वैखरी–वाणी. अबुज–कमल. कनकपात्र–सोन्याचें ताट.

## शाळा

सवगडी–मित्र. डोह–नदीच्या प्रवाहातील खोल पाण्याची जागा.
आस–आशा, इच्छा. गेह–घर. सुधा–अमृत. सान–ल्हान.
उजळली–स्वच्छ केली विस्तरीली–वाढविली

## फुलपांखरूं

'फुलपाखरू' व 'चिमणें बालक' याची तुलना कवीनें केली आहे.

## स्फुट अभंग

१ नीचपण–ल्हानपण; नम्रपणा. ल्हरी–लाटा सिंधु–समुद्र.
लोहाळें–पाण्याच्या काठीं उगवणारें गवत. रंजले–रंजीस आले.

२ सबाह्य--बाहेरील भागासहित, आत बाहेर, पूर्णपणे नवनीत–लोणी.
आपंगिता–साभाळणारा.

३ साड्डूं नको–सोडूं नको. नाठवीसी–न आठवीसी.

४ तरुवर–मोठें झाड ( तरु–झाड ). जीवन--पाणी. बाळा–बाळाकरितां.
सवें–बरोबर, एकदमच

५ अंगें–स्वतः, जातीनें, स्वकष्टानें किंकर–नोकर.

६ फुकाचे–विन खर्चानें, सहजासहजीं होणारें मळ–पाप
शीतळ–थंड, शांत साडणें–त्यागणें, सोडून देणें

७ पाषाण–दगड. श्वान–कुत्रा. पुच्छ-शेपूट. परीस–स्पर्शानें लोखंडाचें
सोनें करणारा एक पदार्थ ( काल्पनिक ). खल–दुर्जन; दुष्ट मनुष्य.
वज्र–कधीही न भंगणारें इन्द्राचें हत्यार. हित-हितकारक.

## दंवाचे थेंब

हिमकण–दंवाचे थेंब वदला-बोलला. कुतुकानें–जाणण्याच्या इच्छेने.

तनय–मुलगा. गहिंवरली–( दुःखानें ) कंठ भरून आला. गत–गेलेलीं, मेलेलीं.
जननी–आई. कळवळा–कींव. दृढ-घट्ट. बिंदु–थेंब, ठिपका. निज–आपला.

## नामलेखन

सागर–समुद्र. करी–हातात. आत्मनाम–स्वतःचे नांव. सिकता–वाळू. अब्धि, जलधि, वारिधि–समुद्र. साची–खरोखर काति–शोभा. अदय–क्रूर. दूषिलें–दोष दिला. कटु–कडू. विवेक–विचार वीचि–लाटा. अनिवार–अतिशयित. मनुज–मनुष्य सद्म–घर लयास–नाशास. नश्वर–नाश पावणारें, नाहीसें होणारें विषाद–दु:ख. दिव्य–स्वर्गीय

## बाललीला

मेज–टेबल कळी फुलली–आनंद वाटला. विलोकून–पाहून.

मन्मनिं–( मत्+मनि ) माझ्या मनात.

## कृतज्ञता

सेविका–नर्स भयाण–भयंकर, भेसूर. वच–बोलणे. शांतवी–सांत्वन करी. ताण–श्रम लोचनें–डोळे.

( १ ) 'तुम्ही मजला किती गोड वागविलें' या व पुढील दोन ओळींतील शब्दामध्यें टिंबें दिली आहेत, त्याचें कारण काय ?

( २ ) 'बोलला पुढें नाही' तो पुढें बोलूं शकला असता तर त्याने काय म्हटले असतें ?

( ३ ) आजारी मुलाबद्दल वाचताना दया उत्पन्न व्हावी म्हणून कवीनें कोणते शब्द उपयोगात आणिले आहेत ?

## तरुवरा

क्षुद्र–हलकी अवगणिलें–अपमान केला, दुर्लक्ष केले. उपकृति–उपकार.

विहंग–पक्षी. अक्षय–सतत. आसरा–थारा, आश्रय. सुतासम–मुलाप्रमाणें.

सुजन-दुर्जना–सुजनाना व दुर्जनाना. वदन–तोंड.

शाखाकर–( शाखा=फांद्या ) शाखारूपी हात.

विहंग हेंच वदन = विहंगवदन; शाखा ( फांद्या ) हेच कर = शाखाकर; पद्य हेंच सुमन = पद्यसुमन; असे एक दोन शब्द सुचवा.

## कुंतीचें अभयदान

आपल्या विलक्षण आहारानें बकासुरानें ज्या एकचक्रा नगरीला छळले होतें त्या नगरींत पाडव कुंतीसह तपस्व्याच्या वेषानें एका ब्राह्मणाच्या घरीं रहात होते. त्या राक्षसास इतर अन्नाबरोबर एक मनुष्य आहारासाठी लागे आणि तो पाठविण्याची पाळी प्रत्येक कुटुंबावर येई. तशी पाळी पाडव ज्या ब्राह्मणाच्या घरा राहिले होते त्यावर आली त्या कुटुंबात ब्राह्मण, त्याची बायको, मुलगी व लहान मुलगा अशी मंडळी होती. त्यापैकी कुणाला बळी द्यावयाचे हा प्रश्न त्या गरीब ब्राह्मणापुढें पडला. तेव्हां कुंतीनें त्याना अभयदान देऊन भीमाला पाठविलें व त्याच्यावरील संकट टाळलें.

१ अभय ( अ+भय )–धीर. निजजनकाचा पिता–पितामह व्यास
महाज्ञाते–मोठे विद्वान् ( पाडव ) पितामहाज्ञा–आजोबाची आज्ञा. द्विज–ब्राह्मण.

२ सिद्धान्न–शिजविलेलें अन्न. मातृ–आई ( कुंती )
माधुकरी–मधुकर म्हणजे भुंगा. भुंगा निरनिराळ्या फुलापासून मध गोळा करतो त्याप्रमाणे घरोघरी जाऊन अन्न गोळा करणारा तो माधुकरी.

३ भैक्ष्यवृत्ति–भिक्षा मागण्याची वृत्ति. मुदित–आनंदित. परिसे–ऐके.
आश्रयद ब्राह्मणालयी– ( आश्रय + द + ब्राह्मण + आलय )– आश्रय देणाऱ्या ब्राह्मणाच्या घरी. रुदित–रडणें.

४ दुःसह–सहन करण्यास कठीण.

५ नीड–घरटे धरादेव ( धरा + देव )–ब्राह्मण. प्रत्युपकृति–उपकाराची फेड.

६ विप्रनायका–विप्रश्रेष्ठ. पूस–विचार. दहना–अग्नीला. अतिभार–जड.

८ ज्याया–वायको. परस्थळगमन विचार–दुसऱ्या ठिकाणीं जाण्याचा विचार.

९ प्रमदा–स्त्री स्वकुटुंबव्यसन– आपल्या कुटुंबावर आलेलें संकट. बुध–शहाणा.

१० सिंधूदरीं ( सिंधु+उदरीं )–भर समुद्रात.
तितीर्षु–तरून जाण्याची इच्छा करणारा. तरितें–होडीला.

११ नयनयुग–दोन डोळे.

१२ वपु–शरीर. भीरु–भित्री. चिर–निरंतर, सर्वकाळ.

१३ अबळ–अशक्त. कूप–विहीर.

१४ कवि–शहाणा. यन्मूल आपदर्थे–ज्या श्लोकाचा प्रारंभ ' आपदर्थे ' या शब्दानीं आहे तो. ( आपदर्थे धनं रक्षेत्, दारान् रक्षेत् धनैरपि; आत्मानं सततं रक्षेत्; दारैरपि धनैरपि । )
शंकरसा ( श–कल्याण )–कल्याणकारक

१५ विरूपकाय होऊन ( विरूप+काया )–सौभाग्यालंकारविरहित शरिरानें.

१६ नवपूरीं–नव्या जोराच्या पुरांत. जी–जी होडी

१८ विधुर–ज्याची बायको मेली आहे असा

१९ पृथा–कुंती हे–ही

२१ रक्ष्य–रक्षण करण्यास योग्य. प्राज्ञ–शहाणे लोक

२३ लारिंचल–( रात्रिंचर )–राक्षस.

२४ व्यसनार्त–संकटानें पीडित झालेली
अब्दानें ( अप्+दान )—पाणी देऊन.
ग्रीष्मदवाकुळबर्हिकुळें ( ग्रीष्म + दव+आकुळ + बर्हि + कुळ )– उन्हाळ्यांत पेटलेल्या वणव्यानें व्याकुळ झालेले मोराचे थवे.
अब्द–( अप्+द )–पाणी देणारा मेघ

२५ संजीवनी–मृताला जिवंत करणारी. रोगेंकरुनि जीवदेत्याते–रोगानें मरणाऱ्याला.

२६ शोकभर–शोकाचे ओझें

२७ मदात्मज–माझा मुलगा गुरुवरमंत्र–ज्याला श्रेष्ठ गुरूंनीं विद्या शिकविली आहे तो महोतजा–महान् तेजस्वी. सहाते–सहन करणारे

२८ सुरवल्ली–कल्पलता. क्षुद्रलतागुच्छक–किरकोळ झाडाच्या फुलाचा गुच्छ. स्तबक–फुलाचा गुच्छ. मदात्मजचरणीं–माझ्या मुलाच्या पायावर

## जगीं उपमा कोणती त्या गृहातें

अंकुरित—बी पेरली म्हणजे मोड येतो तो अंकुर. अंकुर दिसूं लागला म्हणजे झाड वाढूं लागलें. मनाच्या रम्य वृत्ति घरात ' अंकुरित ' होतात व ' वाढतात ' एवढेंच नव्हे तर त्यास तेथें फुले, सुफळें येतात.

संसृति–संसार मुदा–आनंदानें.

त्रिवर्ग–धर्म, अर्थ आणि काम हे तीन पुरुषार्थ. सोपान–जिना.

**घोषयात्रा**

द्वैतवन—एका अरण्याचें नांव. पंडुकुमार—पांडव.
धार्तराष्ट्र—धृतराष्ट्राचे मुलगे, कौरव.

वैशंपायन—या ऋषीनें जनमेजयास भारत सांगितलें. पैं—अर्थ नसलेलें अव्यय, पाद. पूरणार्थ (जास्त अक्षराची जरूरी लागली म्हणजे) जुन्या मराठी कवितेंत वापरतात.

तात—बाप. कृतात—यम. व्योमकेश—शंकर. निःशेष—सर्व. वासव—इन्द्र.
निजसुरे—ज्यांच्या डोळ्यावरील झोंप गेली नाहीं असे, बेसावध.
लोकपाल—आठ दिशाचे स्वामी. दंदशूक—साप. घोष—गौळवाडा-
गोधनें—गाईचीं खिल्लारें, गवळी राहतात ती जागा. रजनी—रात्र.
चतुरंग—हत्ती, रथ, घोडे आणि पायदळ हीं सैन्यांचीं चार अंगें समजतात.
दल—सैन्य. श्री—वैभव. उडुगण—नक्षत्रें व तारा यांचा समूह.
महामणि—रत्न. मृगेन्द्र—सिंह. वारण—हत्ती. तत्त्वतां—खरोखर.
फावलें—संधि सांपडल्यास. तोषें—आनंदित होई. वांति—ओकलेलें अन्न.
कानन—अरण्य. अंध—आंधळा धृतराष्ट्र. कंठीरव—सिंह. इभ—हत्ती.
महाविखार—महासर्प. धारोष्णपय—नुकतेंच काढलेलें ऊन ऊन दूध.
खर्जूर, कदंब, रातांजन—वृक्षविशेष. गजबजणें—घाबरून जाणें.
रुक्मिणीनयनाब्जविकासमित्र—रुक्मिणीचें नेत्ररूपी जें कमल त्याचा विकास करणारा सूर्य.

पांडवमित्र—कृष्ण. अमित्र—शत्रू. कौरवभार—कौरवांचें सैन्य.
यथेच्छ—हवें तितकें. सुधारस—अमृत. कृष्णागर, मलयागर—चंदनवृक्षाच्या जाती.
आराम—समाधनवृत्ति. निर्जरनाथ—देवांचा राजा, इन्द्र. रामाणिक—सुंदर.
गजबज—गलबला. धाविन्नले—धांवले याचें जुन्या मराठी कवितेंत आढळणारें रूप.
तस्कर—चोर. तवकें—त्वेषानें. बिडालकें—मांजराचीं पिलें. पंथ—रस्ता.
कुंजर—हत्ती. अही—साप. कवेंतून—तावडींतून. मूषक—उंदीर.
निजभारेंसा—आपल्या सैन्यासह. तनुज—मुलगा. नाटोपे—आवरला नाहीं.
ते अवसरीं—त्यावेळीं. वृषभ—बैल. खेळिलें—थोपविलें. पंचानन—सिंह. जंबुक—कोल्हा.
मोहनास्त्र—जें शत्रूंवर सोडलें असतां त्यास मूर्छा येते असें एक अस्त्र.
तुरंग—घोडा. चाप—धनुष्य. तूणीर—बाणांचा भाता. स्यंदन—रथ.

कांतार–अरण्य. गाढे–मजबूत, बलवान्.
धौम्य–ऋषि, पांडवांचा उपाध्याय. वृकोदर–भीम.
कौटिल्य–लबाडी. तळपट–सत्यानाश. रिचवती–ढांसळती.
अजातशत्रु–ज्याला शत्रु नाहीं असा. वैरागर–हिऱ्याची खाण.
कमलपत्राक्ष–कमळाच्या पानाप्रमाणें डोळे आहेत ज्याचे असा, विष्णु.
मंदाकिनी–गंगा नदी. किरीट–मुकुट. निधान–ठेव. उद्यान–बाग.
आणिकें–दुसऱ्यानें. फाल्गुन–अर्जुन. अंतारिक्ष–आकाश. समीर–वारा.
गंधर्वचक्र–गंधर्वांचा समुदाय. शरजाल–बाणांचें जाळें. विचरती–हिंडतात.
त्रिदश–देव. नंदन–मुलगा. एकसरें–एकदम. त्रिदशेश्वर–देवांचा राजा, इन्द्र.
नासिक–नाक. तवाज्ञें–तुझ्या आज्ञेनें. आकर्षून–करकरून.
श्रीकृष्ण भगिनी–कृष्णाची ( मानलेली ) बहीण, द्रौपदी. पांचाली–द्रौपदी.
सर्वज्ञा–सर्व जाणणाऱ्या चित्रसेना गंधर्वा. वासव–इंद्र.

## उद्यांचा वीर

रक्तिमा–लाली. कपोलीं–गालावर. चापल्य–चपलाई. चौफेर–सगळीकडे.
आजित–न जिंकला जाणारा. भवनदी–संसाररूपी नदी. श्वापद–हिंस्र पशु.
विक्रमें–पराक्रमें.

## हा हिंदुदेश माझा

आनंद कंद–आनंदाचा सांठा. ठाव–आश्रय.
जगदीश–परमेश्वर ( अवतार घेतो ). नटेश–शंकर.
कलिज़ा–हृदय;स्वतःच्या हृदयाइतकी प्रिय वस्तु. सिंह–राणा प्रतापसिंह.
पृथुराज–पृथ्वीराज चव्हाण. गाजी–शूर, पराक्रमी.

## कष्टेंवीण फळ नाहीं

प्रत्ययास–अनुभवास. दीर्घसूचना–दूरदृष्टि. उदंड–पुष्कळ; फार.
येर–दुसरे. करंटे–अभागी. संचित–संग्रह केलेलें ( पुण्य ).
नित्यानित्यविवेक–कल्याणकारक कोणतें, अकल्याणकारण कोणतें याचा विचार.

## सीतागीत

धन्या–धन्य जो जनकराजा त्यास. दुर्मिळा–मिळण्यास कठीण.
सुहिता–फार कल्याणकारक. दुहिता–मुलगी. दुजी–दुसरी.

व्यथा–दुःख, क्लेश. रिघालों–जावयाला निघालों शिरलों. धामीं–घरीं.

क्षुधा–भूक. तृषा–तहान. धणी–समाधान; तृप्ति. गुण–दोरा.

मृषा–खोटें. कर्णनासाच्छेद–कान व नाक कापून टाकणें.

भावोजींनीं . शास्त्रार्थज्ञ–स्त्रीचा वध करूं नये, किंवा तिच्यावर हत्यार चालवूं नये अशी शास्त्राची आज्ञा आहे. हें माहीत असूनहि तिचा दुष्ट हेतु लक्षांत घेऊन लक्ष्मणानें तिचे कान व नाक कापले.

रणीं–युद्धात. पिष्ट–पीठ. पिष्ट केलें–मारून टाकलें. घ्राण–नाक.

मायामृग–कपटानें हरिणाचें सोंग घेतलेला ( राक्षस ). लेखिला–मानिला.

स्वर्ण–सुवर्ण, सोनें. परिणामीं–शेवटीं. जगदेकशूर–जगांतील एकच एक वीर. मोकलीला–सोडला. स्वामीवाणी–स्वामी ( रामा ) सारखी. शब्दरोपें–शब्दरूप बाणानें.

अग्रज–वडील बंधू. पादत्राण–पायातील जोडा. त्याचा लेखा–रावणाचा पाड.

छद्म–कपट. मातेनें दापीन–आई ज्यावर रागावली आहे असा.

महाकाय–मोठ्या शरिराचा. कोमेला–कोमेजला.

‘ जसा हारिणीतें हरीतो लांडगा तसा तो दांडगा हरी मातें ’–

या ठिकाणीं उपमा आहे. ( सीता ही हरिणी; रावण हा लाडगा. क्रूर लाडगा जसा गरीब हरिणीला नेतो तसें त्या दाडग्या रावणानें कोमल सीतेला नेलें. )

अशी आणखी एखादी उपमा या कवितेंत तुम्हाला सापडते काय ?

## प्रियकर हिंदिस्तान

उपमान–तुलना करण्याजोगी वस्तु. ( ‘ झाडासारखा उंच ’ असें म्हटलें म्हणजे ‘ झाड ’ हें उपमान होतें. ) निधान–स्थान. तुला–बरोबरी.

हिंदिस्तान–‘ हिंदुस्तान ’ बद्दल हा शब्द कवीनें मुद्दाम योजिला आहे. हिंदुस्थान म्हटल्यास हिंदुधर्मीयाचा देश एवढाच अर्थ सूचित होईल. हिंदी मनुष्य पारशी, ख्रिश्चन, मुसलमानही असेल. या सर्वांचा देश तो ‘ हिंदिस्तान. ’

---